# एक

आदित्य नारायण ही व्यक्ती जुहू बीचजवळ राजेशाही थाटात राहणारी व्यक्ती. त्याचा बंगला पाहणाऱ्याला वाटावे एकादे सुंदर मंदिर बांधलेले आहे. कलाकुसर पाहून त्या मंदिराचे बांधकाम किमान चारपाचशे वर्षापूर्वी झालेले असावे अशीही शंका येऊन जावी.

पण त्या माणसाबद्दल कुणाचेही फारसे चांगले मत नव्हते. पोलिसाच्या काळ्या यादीत तो संभ्रमावस्थेत असला तरी अगदी अग्रभागी झळकत होता. शेअर बाजारात तर त्याचा धसकाच घेतलेला होता. कोणत्या धंद्यात तो केव्हा आणि कसे नाक खुपशील हे आजपर्यंत कोणालाही सांगता आले नाही.

आदित्य नारायण हे त्याचे खरे नाव आहे याविषयी देखील अनेकांना शंका होती. आठदहा वर्षापूर्वी त्याचे नाव देखील मुंबईत कुणाला ठाऊक नव्हते. एकादा धुमकेतु अचानक आकाशात दिसावा तसा तो मुंबईत उगवला :. पण धुमकेतू सारखा पाहातापाहता नाहिसा मात्र झाला नाही. ध्रूवाप्रमाणे तो मानाचे स्थान मिळवून अढळ राहिला.

उंची सहा फुटापेक्षाही एक दोन इंचानी अधिक. गोरापान आणि डोळे घारे. संपूर्ण शरीर मजबूत.

बंगल्यांच्या डाव्या बाजुला आदित्य नारायणने तयार केलेले देवघर नासिकमधील मुक्ती धामाला लाजवण्याइतके वैभवशाली होते. कमीत कमी तीन लाख रुपये बंगल्यातील छोट्या मंदिरासाठी त्याने खर्ची घातलेले होते. त्यावेळी साडेआठ वाजलेले होते आणि लक्ष्मी नारायणच्या गाभाऱ्यासमोर उभा राहून आदित्य नारायण पूजा करीत होता. लक्ष्मी नारायणच्या देवघरातील दोन्ही मूर्ती एखाद्या सार्वजनीक मंदिरात ठेवल्या तर गर्दी हटवण्यासाठी शेकडो पोलिसांची मदत घ्यावी लागली असती इतक्या त्या जीवंत वाटत होत्या.

नऊ वाजता आदित्य नारायणाची पूजा संपली. डाव्या हातात चांदीचे तबक आणि उजव्या हातात तांब्याचा लोटा घेऊन तो देवघरातून बाहेर पडला आणि चिंताग्रस्त चेहरा करुन परशू उभा असलेला त्याने पाहिला.

हा परशू म्हणजे आदित्याचा शरिररक्षक, ड्रायव्हर अर्धा सेक्रेटरी.

पाच फूट चार इंच उंचीचा परशू हा आदित्याचा कोणताही हुकूम झेलायला सदैव तयारीत असायचा. आदित्य नारायण हा दुहेरी जीवन जगत होता. एका जीवनातील आदित्याचा सेक्रेटरी एक स्त्री होती. त्याच्या ऑफिसचा सारा व्यवहार एक तरुणी पाहायची. पण त्याच्या काळ्या जीवनातील सेक्रेटरी होता परशू.

'साहेब, सारा माल बालाजीने घेतला.'

'त्याची बोली कितीची ?' जागच्या जागी थबकून आदित्याने विचारले.

'सर, सोळा लाख सत्तर हजार हा आकडा त्यानं उच्चारला आणि ताराबाईनी माघार घेतली.'

सोळा लाखापर्यंत बोली चढवायची अशाच सूचना आदित्य नारायणाने आपल्या सेक्रेटरीला.. ताराबाईला दिलेल्या होत्या.

पण साडे सोळा लाखापर्यंत ती निश्चित गेली असणार हे परशूने न सांगता देखील त्याने ओळखले.

' साहेब, सोळा लाख साठ हजारापर्यंत त्या बोलल्या. बालाजी हरणार नाही असं दिसून येताच ताराबाईनी बोली आवरती घेतली.'

' परशू, तूं कुठं जाऊं नकोस.. मी बोलाविन तेव्हा माझ्या खोलीत ये. ' आदित्याने कठोर आवाजात हुकूम सोडला. घाईघाईत तो परशूला तिथेच सोडून निघून गेला. तेव्हा नुसता तापलेला होता. यावेळी त्याचा वेष मंदिराच्या पुजाऱ्यासारखा असला तरी त्याच्या चेहऱ्याने मात्र दुर्वास ऋषीला पचवलेले दिसून येत होते.

त्याने सोवळे काढून टाकले. त्याने बाहेर जाण्याचे कपडे अंगावर चढवले. आदित्य नारायणासारखा कोटयाधीश, पण सफेद पायजमा आणि झब्बा त्याने अंगावर चढवला. नेहमी तो जवळ बाळगीत असलेली शस्त्रे त्याने जागच्या जागी व्यवस्थित ठेऊन दिली आणि आपल्या खास खोलीत आला.

आदित्याची खास खोली म्हणजे एक तिजोरीच होती. त्याठिकाणी साऱ्या बटणाचाच चमत्कार होता. ती केबिन चावी शिवाय उघडता येत होती फक्त आदित्यालाच. त्याच्याशिवाय दुसरी कोणतीही व्यक्ती त्या केबिनचे दार उघडू शकत नव्हती. त्याने केबिनमध्ये प्रवेश केला. आणि आपोआप दार बंद झाले. घाईघाईत त्याने टेलिफोन असलेल्या स्टॅण्डवरची डिरेक्टरी उचलली. बालाजी शेट्टी या नावावर असलेला फोन नंबर त्याने शोधून काढला. शांतपणे रिसिव्हर उचलून त्याने तो नंबर फिरवला.

रिसिव्हरमधून कानात शिरलेला बालाजीचा आवाज त्याने अचूक ओळखला.

' हॅलो, मी आदित्य नारायण बोलतोय ' नेहमीच्याच गंभीर आवाजात त्याने शब्द उच्चारले.

' नमस्कार साहेब, काय हुकूम आहे ?' बालाजीने सहजरित्या उच्चारलेले ते शब्द चेष्टायुक्त असावेत असे उगाचच आदित्याला वाटले.

' बालाजी, तो लिलाव माझ्या दृष्टीने महत्वाचा होता. '

' त्याला माझा इलाज नाही साहेब. नाही तरी मी सुद्धा पैशाच्याच मागे असतो. '

' बोल बालाजी, तुला या व्यवहारात किती पैसे मिळतील ?

' निव्वळ फायदा साडेतीन लाखाचा. '

' मी तुला चार लाख दिले तर ?'

' सोन्याहून पीवळं साहेब. ' चार लाखाचा आकडा ऐकून बालाजी खूष झालेला आहे हे आदित्याच्या लक्षात आले.

' तुला चेक हवा का रोख रक्कम ?'

' साहेब रोख दिलीत तर बरं होईल.

' कुठं पाठवू ?'

' मीच येईन साहेब. '

' कुठं येणार?' बोलत असतानाच आदित्याचा चेहरा एकाएकी कठोर बनला, पण त्या रागाचा परिणाम त्याने आवाजावर किंचितही होऊं दिला नाही.

' ऑफिसात येऊं साहेब ?'

' नाही... मी ऑफिसात जाणार नाही. '

' बंगल्यावर ?'

' ये.'

' किती वाजता येऊं साहेब ?'

' संध्याकाळी पाच वाजता ये.'

आदित्य नारायणाने रिसिव्हर खाली ठेवला तेव्हा त्याचा चेहरा भयानक बनलेला होता. त्यावेळी बेफाट योजना त्याच्या मनात तयार होत होती. अशा या योजना त्याला काही नविन नव्हत्या. दोघाचौघांच्या माना कापायची योजनासुद्धा यापूर्वी त्याच्या मनात झटपट तयार झालेली होती.

त्याने कपाटातील एक फाईल केवळ पाचच मिनिटे चाळून पाहिली. फायद्याची आणि तोट्याचे कोणते तरी गणित त्याने केले. फाईल जागच्याजागी ठेवून आदित्य नारायण आपल्या खोलीतून बाहेर पडला आणि थेट आपल्या ऑफिसच्या केबिनमध्ये येऊन बसला.

बंगल्यात असलेले त्याचे ऑफिस हे अत्यंत खाजगी होते. त्या ऑफिसात काम करणारी माणसे परशूप्रमाणे कोणताही हुकूम पाळायला मागेपुढे पाहणारी नव्हती. पण ताराबाईच्या हाताखाली असलेले त्याचे दुसरे ऑफिस लालबागला होते, भव्य अशा इमारतीत अत्याधुनीक सोयी असलेल्या जागी.

त्याने परशूला बोलावले. आदित्याचा चेहरा पाहूनच बऱ्याच गोष्टी परशूच्या लक्षात आल्या. नाहीतरी आपल्या कोणत्याही माणसाला सविस्तर सूचना देण्याची पाळी आदित्यावर कधीच नव्हती.

'परशू, बालाजी पाच वाजता येणार आहे.' चांदीच्या तबकात असलेले सुपारीचे खांड तोंडात टाकीत आदित्याने वाक्य उच्चारले.

'साहेब त्यावेळी मी इथं राहू ?' परशूने अदबीने विचारले

पण उत्तर देण्याऐवजी आदित्याने तोंडात टाकलेले सुपारीचे खांड दातात धरुन कट्कन फोडले. परशू दचकला. आदित्य संदपणे हसला.

* * *

बालाजी शेट्टी हा माणूसच अगदी "और होता. आयुष्यात

त्याने अनेक धंदे केलेले होते. समाजाला आणि पोलिसाना आपला धंदा आवडतो की नाही याची फिकीर करण्याऐवजी आपण तो धंदा किती प्रामाणिकपणाने करतो याकडेच तो सारे लक्ष केन्द्रीत करीत होता.

सोळा लाख सत्तर हजाराचा लिलाव तो बोलला तेव्हा त्याची कल्पना अगदी वेगळी होती. आदित्य नारायणाची सेक्रेटरी ताराबाई कोणत्याही परिस्थितीत हा लिलाव जाऊ देणार नाही याचीही पक्की खात्री त्याला होती. बाकीच्या बोलिदारानी पंधरा लाखातच नांग्या टाकलेल्या होत्या.

सोळा लाख पन्नास हजारावर बालाजीने पाच हजार वाढवले. त्यावेळी माघार घेण्यासाठी आपल्याला ताराबाईकडून दोन अडीच लाख सहज मिळून जातील अशीच त्याची कल्पना होती. सोळा लाख साठ हजार ताराबाई बोलली. बालाजीने दणक्यात दहा हजार वाढवले. त्याने ताराबाईच्या निराश नजरेकडे पाहून ती बोली बोलण्याऐवजी आपल्याजवळ येऊन हलक्या आवाजात माघार घेण्याची विनंती करील आणि चार पाच हजार रुपये वाढवील हाच तर्क त्याने केलेला होता. अडीच लाख रुपये मागण्याचे देखील त्याने ठरवलेले होते.

पण घडले मात्र भलतेच.

ताराबाई माघार घेऊन निघून गेल्या, आणि सुन्न झालेल्या अवस्थेत ती गेल्या दिशेला बालाजी वेड्यासारखा पहातच राहिला.

आतापर्यंत त्याने मुंबईत कोणताही लिलाव सोडला नव्हता. पण कोणत्याही लिलावाचा शेवट त्याने गाठलेला नव्हता. प्रत्येक लिलावात त्याला काही ना काही तरी फायदाच झालेला होता.

बेचैन अवस्थेत तो आपल्या फ्लॅटवर आला. तीन दिवसाच्या आत लिलावाची रक्कम भरुन माल उचलला नाही तर अनामिक

म्हणून भरलेले पंच्याहत्तर हजार रुपये पाण्यात जातील याच एका विचाराने तो बेचैन बनलेला होता. शेवटी त्याने अनामिक रकमेवर पाणी सोडण्याचा निर्णय घेतला.

सव्वा दहा वाजता त्याने ताराबाईना फोन केला. पण मालकांना सांगितल्याशिवाय आपण कोणताही निर्णय घेणार नाही हे उत्तर तिने दिले. रिसिव्हर खाली ठेऊन तो पुन्हा जाण्यासाठी आपली ब्रिफकेस उचलणार तोच फोन घणघणायला सुरुवात झाली. कपाळावर आठ्या आणित त्याने रिसिव्हर उचलला.

आदित्य नारायणाचा आवाज ऐकताच त्याच्या मनातील निराशा पहाता पहाता नाहिशी झाली. आपल्याला चार लाख रुपये मिळणार या जाणीवेने तर तो पार हरवून गेला.

ठिक पाच वाजता त्याने आपली कार बंगल्याच्या फाटकातून आत घातली. आदित्य नारायणाच्या बंगल्यात प्रवेश करण्याची ही त्याची पहिलीच वेळ होती. बंगल्याची भव्यता आणि वैभव पाहून त्याचे काळीज दबकल्यासारखे झाले.

'आपण बालाजी शेट्टी ?' घाईघाईत पुढे आलेल्या एका नोकराने अदबिने विचारले.

'हो...'

'साहेब आपलीच वाट पहात आहेत.' त्या नोकराने अदबिने सांगितले.

बाहेरच्या माणसाला आदित्य आपल्या खास खोलीत कधीच येऊं देत नव्हता. पण या पाच वर्षात प्रथमच त्याने भेटायला आलेल्या व्यक्तीला आपल्या खास खोलीत नेताना नोकराने पाहिले. सर्वानाच आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही.

पण आश्चर्य वाटले नाही अशी एकच व्यक्ती त्या बंगल्यात होती. ती म्हणजे परशू. त्याच खोलीत परशू किंचित पुढे सरकवलेल्या कपाटाच्या मागे उभे होता.

'बैस बालाजी.' आदित्य नारायणाने हंसून त्याचे स्वागत केले. त्यावेळी बालाजी चार लाखांच्या धुंदीत होता एकाच लिलावात इतकी मोठी कमाई ही त्याच्या दृष्टीने एक परवणीच होती.

'साहेब, तुम्हाला राग तर आला नाही ?' बालाजीने मान-भावीपणा सुरु केला. कुणाला कसे खूष करावे ही कला त्याला उत्तम रितीने साध्य झालेली होती. पण आदित्य नारायणासमोर आपण फारसा अभिनय करु शकणार नाही आणि आपला मानभावी-पणा त्याठिकाणी चालणार नाही याची मात्र बालाजीला मुळीच कल्पना नव्हती.

'बालाजी, कायदेशीर कागदपत्र तयार करुन आणलेस!' गंभीर होत आदित्याने विचारले.

'आणलेत साहेब.'

बालाजीने टाचणीने टाचलेले चार पाच कागद टेबलावर ठेवले. दहा मिनिटे खर्ची घालून आदित्याने ते वाचून पाहिले. त्यात काहीच कमतरता नाही याची त्याने खात्री करून घेतली. टेबलाचा खण उघडून नोटांची चाळीस बंडले टेबलावर टाकली.

'बालाजी, इतक्या मोठ्या रकमेचा लिलाव तू बोलशील अशी आमची अपेक्षा नव्हती.' बोलता बोलताच आदित्याने मेजाच्या खणात घातलेला हात बाहेर काढला आणि शांतपणे काढलेले रिवॉ-ल्वर बालाजीवर रोखले.

'आता बोल, तुला हे चार लाख हवेत का प्राण हवेत ?' आदित्य नारायणाचा आवाज एकाएकी कठोर बनला आणि रिवॉल्वरच्या नळीवर त्याची नजर रोखली गेली.

या अनपेक्षित प्रकाराने बालाजी हादरला. आदित्य नारायणाचे एक वेगळे स्वरूप त्याला पाहायला मिळाले.

'साहेब, याचा अर्थ काय ?' मृत्यूची भीती असली तरी त्याने स्वत:ला कसेबसे सावरले.

'बालाजी, तूं बोलला नसतास् तर पंधरा लाखापर्यंत हा लिलाव आमच्या पदरात पडला असता. बोली सोडण्यासाठी लाख-भर रुपये आम्ही तुला निश्चीत दिले असते. तुला जर खरोखरीच जगायचं असेल तर यातली दहा बंडलं उचल आणि चालायला सुरुवात कर.' आदित्य नारायणाने कठोर आवाजात धमकावले. हादरलेल्या बालाजीने स्वतःला सावरण्याचा प्रयत्न करीत थंड नजरेने आदित्याकडे पाहिले. दहा बंडले उचलून त्याने ब्रिफकेसमध्ये नीट रचून ठेवली.

शांतपणे तो खुर्चीतून उठला. पाहता पाहता त्याचा चेहरा अगदी शांत बनला. मनात खुनशी विचार थैमान घालू लागले, पण बंद दाराकडे पाहून त्याने आपला विचार बदलला.

'बालाजी, ठकाला महाठक कधी ना कधी तरी भेटत असतो.' खुषीत आलेल्या आदित्याने शब्द उच्चारले.

'पटलं साहेब. ठकाला महाठक कधीतरी भेटतोच. प्रत्येकाच्या नावावर ठराविक दिवस नोंदलेले असतात.' मनातील राग आवरीत बालाजी बोलून गेला.

आणि त्याचवेळी बालाजीनें वेगवान हालचाल केली. आदित्याने रिवॉल्वर खिशात टाकलेले आहे हे लक्षात येताच बालाजीने हा पवित्रा घेतलेला होता. त्या केबिनमध्ये आदित्य नारायणशिवाय कुणीही नाही याची खात्री झाल्यानंतर.

पण इथेच तो फसला. कपाटाच्या आडोशाला परशू दडलेला आहे याची किंचितही कल्पना त्याला नव्हती. अचानक उजव्या कुशीत सप्कन काहीतरी शिरले. नकळत तो जोरात ओरडला. त्याच्या हातातील पिस्तुल मऊ गालीच्यावर कोसळले.

परशूने एका उडीत बालाजीला गाठले. त्याच्या कुशीत शिरलेला सुरा परशूने खच्कन खेचून काढला आणि दुसऱ्याचक्षणी त्याच्या गळयात खुपसला.

बालाजी शेट्टी तडफडत खाली कोसळला. रक्ताच्या धारा गालीच्यावर ओघळू लागल्या, पण दोघानाही त्याची मुळीच फिकीर वाटली नाही किंवा गालीचा खराब होऊं नये याची देखील भीती वाटली नाही.



## दोन

इन्स्पेक्टर चौधरी कितीतरी वेळ त्या प्रेताकडे पाहात होते. ठार झालेला माणूस आपण कुठेतरी पाहिलेला आहे हाच विचार त्याच्या मनात घोळत होता, पण कोणत्या ठिकाणी हे मात्र सांगता येत नव्हते.

ओळख पटण्यासारखी कोणतीही वस्तू त्याच्या खिशात सापडलेली नव्हती. पचनामा करून प्रेत इस्पितळात पाठवण्यात आले, आणि प्रेताचे काढलेले फोटो घेऊन आणि डोक्याला हात लावून चौधरी आपल्या ऑफिसात येऊन बसले.

त्या अज्ञात व्यक्तीचा खून झालेला आहे हे अगदी उघड होते. सुऱ्याचा एक वार उजव्या कुशीत झाला होता तर दुसरा वार गळ्यात. ज्या हत्याराने खून झाला ते पोलिसाना सापडले नव्हते.

ज्या ठिकाणी प्रेत सापडले त्याठिकाणी रक्ताचा थेंबही पडलेला सापडला नव्हता. या माणसाचा खून होऊन कमीत कमी अठरा ते बीस तास लोटले असावेत असे घटनास्थळी आलेल्या

पोलिसांच्या डॉक्टरांचें मत होते. आपला डॉक्टर असे तर्क करताना चूक होऊ देणार नाही याविषयी चौधरींना पक्की खात्री होती.

संध्याकाळी चौधरींनी प्रेताचे फोटो मुंबईतील झाडून साऱ्या वर्तमानपत्राकडे पाठवून दिले. पण वरिष्ठाना खुनाच्या गांभीर्याची काहीच कल्पना दिलेली नसल्यामुळे 'बक्षीस- योजना ते जाहिर करु शकत नव्हते.

दुसऱ्या दिवशीं दहा वाजता घाबरलेली एक व्यक्ती त्याच्या ऑफिसात शिरली. दुपारपर्यंत कांहीही घडले तरी आपण ऑफिस सोडायचे नाही असा निर्णय त्यांनी घेतलेला होता.

त्या माणसाचे वय होते पन्नास. अंगावरचे कपडे अगदीच साधे होते. कोणत्यातरी घरी तो नोकरी करीत असावा हे पाहताक्षणीच चौधरीने ओळखले.

'साहेब, काल ज्याचं प्रेत सापडलं तो याचा मालक.' हवालदाराने त्या माणसाला चौधरीच्या समोर उभा करीत सांगितले.

इन्स्पेक्टर चौधरीने त्या माणसाकडे प्रथम बारकाईने पाहून घेतले. तो अतिशय घाबरलेला आहे याची जाणीव त्याना झाली.

'नाव काय ?'

'गणेश . . .'

'तू काय सांगणार आहेस'

'साहेब, हा फोटो माझ्या मालकाचा आहे.'

'नांव काय ?'

'बालाजी शेट्टी.'

'धंदा कोणता ?'

'मला माहित नाहीं साहेब. मी त्याच्या घरातील पडेल ते काम करणारा एक नोकर.'

'हा तुझा मालक सर्वांत शेवटी तूं केव्हा पाहिलास ?'

इन्स्पेक्टर चौधरीने विचारले आणि आपण याच्याशी कडक वागण्यात चूक केलेली आहे हे त्यांच्या लक्षात आले.

‘ हे बघ गणेश, तुझ्या मालकाचा खून झालेला आहे. खुनी पकडणं हे आमचं जसं काम आहे तसंच खुनी माणसाला पकडण्यासाठी मदत करणं हे तुझं काम आहे. ’

‘ साहेब, माझ्या मालकाला ज्यानं मारलं त्याला पकडण्यासाठी तुम्ही म्हणाल ते मी करीन. ’ गणेशने ठामपणाने सांगितले. त्याच्या मनातील भिती मालक ठार झाल्याची आहे... पोलिसांची नाही हे चौधरीच्या लक्षात आले.

‘ तू सर्वात शेवटी त्याला पाहिलस केव्हा ?’ चौधरींनी आपल्या प्रश्नाची फैर खऱ्या अर्थाने आता सुरु केली.

‘ काल सकाळी सात वाजता. मालक घरातून बाहेर पडले. साडेसात वाजता लिलाव बोलण्यासाठी त्यांना जायचं होतं. पुन्हा ते घरी आले तेव्हा जवळ जवळ दहा वाजलेले होते. ’

‘ गणेश, तू त्यांना सर्वात शेवटी केव्हा पाहिलंस असं मी विचारलं. ’

‘ साहेब, संध्याकाळी साडेचार वाजता ते घरातून बाहेर पडले... त्यानंतर मी त्याना पाहिलेलं नाही. ’

‘ काल ते तुझ्याशी नेहमी प्रमाणे बोलले ?’

या प्रश्नाने मात्र गणेश गोंधळला. त्याच अवस्थेत तो बराच वेळ चौधरीच्या चेहऱ्याकडे पहातच राहिला.

‘ साहेब, सकाळी जेव्हा ते घरातुन बाहेर पडले तेव्हा मला अतिशय खुषीत असलेले दिसून आले. पण जेव्हा आले तेव्हा मात्र त्यांच्या मनाविरुद्ध काहीतरी घडलेलं असावं अशी शंका मला आली. ते माझ्याशी नेहमीसारखे बोलले नाहीत. ’

‘ संध्याकाळी साडेचार वाजता जेव्हा ते घरातून बाहेर पडले तेव्हा त्यांची मन:स्थिती कशी होती ?’

' अतिशय चांगली होती साहेब. इतक्या आनंदात आणि खुषीत मी त्यांना कधीच पाहिलं नव्हतं. '

' खुषीचं कारण काय ?'

' साहेब, सकाळी दहाच्या सुमाराला ते आले. मी त्याना ब्रेकफास्ट करणार का असं विचारलं.. त्यावेळी ते माझ्यावर चिडले. त्याचवेळी त्याना एक फोन आला. बोलणं काय झालं ते मला माहित नाही साहेब. पण फोन खाली ठेवल्यानंतर त्यानी मला खुषीत हाक मारली. '

' गणेश, यापुढं तू जे काही सांगणार आहेस ते नीट विचार करून सांग. . . . त्यावरच आमची सारी मदार रहाणार आहे. '

' साहेब, तुमच्यापासून मी काहीही दडवणार नाही.'

' फोनवर झालेलं त्यांचं बोलणं तू खरंच ऐकलेलं नाहीस ?'

' खरंच ऐकलेलं नाही साहेब. त्यावेळी मी बाथरुममध्ये होतो. बादली नळाखाली होती. पाण्याच्या आवाजात मला बोलणे नीट ऐकू येत नव्हते. '

' जाताना मालकानी तुला काहीच सांगितलं नाही ?'

' नाही साहेब . . . आता आठवलं साहेब, बसल्या बसल्या भरपूर कमाई झाली... नारायणासारखा प्रसन्न झाला तर कमतरता कशाची ? असं बोलत मालक घरातून बाहेर पडले... पण परत आलेच नाहीत साहेब. '

' जाताना त्यानी वाहन नेलं होतं ?'

' आपली कार नेली होती साहेब. '

' कसली ?'

' तुला नंबर आठवतो ?'

' होय साहेब. ' गणेश बोलला आणि त्याने बालाजीच्या फियाट कारचा नंबर सांगितला.

' गणेश, हा नारायण कोण ?'

' मला माहीत नाही साहेब... आदित्य नारायण असं काहीसं नांव घेतल्याचं आठवतं. '

' आदित्य नारायण ?'

' होय साहेब... ठीक पाच वाजता देवळात जायला हवं असं म्हणून ते गेले. '

आता मात्र चौधरी अतिशय सावध झाले. गणेशबरोबर बोलत असताना बऱ्याच गोष्टीचा खुलासा होईल हे इन्स्पेक्टर चौधरीनी गृहीत धरलेले होते.

जवळ जवळ पाऊण तास चौधरी गणेशबरोबर बोलत होती. जेव्हा फारशी माहिती त्याच्याकडून मिळणार नाही असे त्याना वाटले तेव्हा त्यानी गणेशला जाण्याची संमती दिली.

गणेश निघून गेला आणि घाईघाईने चौधरीनी फोनवरचा रिसिव्हर उचलला. त्यानी बालाजीच्या कारचा नंबर सर्वत्र पसरवण्याची व्यवस्था केली. रिसिव्हर खाली ठेऊन त्यानी खणातून डायरी काढली. गणेशनें सांगितलेली माहिती आणि काही नावे केवळ स्मरणासाठी डायरीत नोंद करायला सुरुवात करणार तोच गोळीबाराच्या तीन फैरी त्यांच्या कानात शिरल्या. घाईघाईत ते केबिन बाहेर आले, आणि फुटपाथवर तडफडत असलेला गणेश त्याना पाहायला मिळाला.

' साहेब, ते कारमागून पळाले. ' गणेश जवळ उभा असलेल्या हवालदाराने जोरात ओरडून सांगितले. त्याचवेळी दुसऱ्या एका हवालदारने कार गेल्या दिशेला भरवेगात मोटारसायकल सोडलेली त्यानी पाहिली.

गणेशची तडफड फार वेळ चालली नाही. त्याचे शरीर शांत झाले. आणि फुटपाथवर रक्ताचे थारोळे साचायला सुरुवात झाली. त्यावेळी इन्स्पेक्टर चौधरी हे धाडस करणाऱ्या बदमाषांचाच विचार करीत होते. गणेशला ठार करणारे बदमाष अतिशय मुरलेले

आहेत याची खात्री त्याना झालेली होती, आणि म्हणूनच नकळत या प्रकाराला गंभीर वळण लागलेले होते.

* * *

परशू हा एक टेअरर बदमाष. बालाजीच्या प्रेताची विल्हेवाट लावण्याचे काम त्याने पहाटेलाच आटोपून टाकलें. त्यावेळी अशीच दुसरी कामगिरी आपल्या माथी मारली जाईल याची कल्पना परशूला नव्हती.

पहाटे सहा वाजता तो बंगल्यावर आला, त्यावेळी आदित्य नारायण स्नानाला जाण्याच्या तयारीत होता. आपण प्रेत कोणत्या ठिकाणी टाकलेले आहे याची माहिती परशूने दिली.

'परशू, बालाजीच्या नोकरावर लक्ष ठेव. काल संध्याकाळी बालाजी या बंगल्यात आला होता हे म्हाताऱ्या नोकराला माहित असेल.' परशूच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करीत हुकमी आवाजात आदित्य बोलला.

'साहेब त्याला ताब्यात घेऊ ?'

'नको. पोलिसानी फोटो देऊन गुन्हेगार शोधुन काढण्यासाठी वाचकाना विनंती केलेली आहे. कदाचित तो फोटो पाहून बालाजीचा नोकर पोलिसांकडे जाईल.'

'तसं झालं तर मी काय करु साहेब ?'

'जे तुला योग्य वाटेल ते कर... पण तू करशील ते माझ्यापर्यंत येता कामा नये.'

'साहेब, काल बालाजी याठिकाणी आला होता हे गणेशला ठाऊक असलं तर ?'

'तर त्यांचा बालाजी कर.' कठोर आवाजात आदित्य नारायणाने शब्द उच्चारले. झपाझप पावले टाकीत तो परशूपासून दूर झाला आणि बंगल्याच्या आतल्या भागात मिघून गेला.

आदित्य नारायणचे हे वागणे परशूला नविन नव्हते,

मालकाचा आपल्यावर पुर्णपणें विश्वास असल्यामुळेच आपल्याला अशा अर्धवट सूचना मिळतात अशीच त्याची समजूत होती.

परशू बंगल्यातून पुन्हा बाहेर पडला. मोटारसायकल घेऊन तो वरळीला आला. एका गल्लीत परशूची गॅन्ग सूचनेप्रमाणें वाट पहात थांबलेली होती. त्या टोळीतील एकजण त्याच गल्लीत राहात होता.

परशूला मदत करणारी ती गँग सामान्य नव्हती. आपण कुणाचे काम करीत आहोत हे त्या टोळीत कुणालाही ठाऊक नव्हते. पण दर आठवड्याला भरपूर पैसे मिळत असल्यामुळे त्याना आपला मालक कोण हा विचार करण्याची मुळीच गरज नव्हती.

त्याने दोघानाही आपल्या मोटारसायकलीवरुन बालाजीच्या फ्लॅटबर नजर ठेवण्यासाठी पाठवले. रात्रभर धावपळ झालेली असल्यामुळे परशूला विश्रांतीची गरज भासत होती. तासभर तरी आपल्याला झोप काढता येईल. असा विचार करुन तो थांबलेला होता. इतक्यातच काही घडेल हे त्याला सांगता येत नव्हते. बालाजीचा नोकर पोलिसांकडे जाईल यावर देखील त्यांचा विश्वास बसत नव्हता. आणि म्हणूनच तर उगाच धावपळ करायला त्याची तयारी नव्हती.

पावणे दहा वाजले आणि पाठवलेल्या दोघातील एकजण घाईघाईत मोटारसायकल पिटाळीत वरळीतील त्या गल्लीत आला. बालाजीचा नोकर पोलिस स्टेशनवर गेलेला आपण पाहिल्याचं त्याने सांगितले. परशूच्या डोळ्यावरची झोप खाड्कन उडाली. बालाजीचा नोकर पोलिसांकडे गेलेला आहे या जाणीवेनेच परशू इतका हादरुन गेला की क्षणभर आपण काय करावे हे सुद्धा त्याला समजले नाही.

'जग्गू, तो जिवंत राहता कामा नये.' एकाएकी परशूच्या तोंडून शब्द बाहेर पडले.

मुम्बईत आणि बदमाषांच्या वर्तुळात तो अतिशय मुरलेला

होता. पोलिसांच्या हातात असलेला पुरावा कोणत्या पद्धतीने नष्ट करावा हे त्याला पुरेपूर माहित होते. बालाजीच्या नोकराने जरी आदित्य नारायणाचे नांव सांगितले तरी त्यामुळे फारसे काही बिघडणार नाही हे परशूने अंदाज घेऊन ठरवले. गणेश नाहीसा झाला तर पोलिसाच्या हाती काहीही राहणार नाही हा विचार त्याने केला.

जबरदस्त धाडस करणे हेच परशूला आतापर्यंत आवडत होते. आताही पोलिसाना जबरदस्त हादरा देण्याचा विचार परशूच्या मनात आला. दडून ठेवलेली बालाजीची कार त्याने बाहेर काढली.

निदान यावेळी तरी पोलिसाना सापडलेली बालाजीची कार बाहेर काढणे अत्यंत धोक्याचे होते. आपण कालचा दिवस आणि कालची रात्र फुकट घालवली... त्यावेळात आपल्याला बालाजीच्या नोकराचा बंदोबस्त करता आला असता ही जाणीव आता कुठे परशूला झालेली होती. प्रेताची विल्हेवाट लावून काल सकाळीच आपण मालकाकडे गेलो असतो तर बरे झाले असते असे त्याला वाटले. पण मालकाच्या हुकूमाप्रमाणे तो वागलेला होता.

असे कोणतेही काम केल्यानंतर किमान चोवीस तास तरी बंगल्यापासून दूर राहावे अशीच मालकाची सूचना होती.

बालाजीची कार आणि कारच्या मागच्या बाजूला बसलेल्या इब्राहिमच्या हातात रायफल अशा जय्यत तयारीनिशी परशू निघाला.. त्यावेळी कारमध्ये दोघांशिवाय आणखी कुणीही नव्हते. कार चालवण्यासाठी बसण्यापूर्वीच परशूने संपूर्ण कार ओल्या फडक्याने पुसून घेतलेली होती. इतकेच नव्हे तर आतल्या बाजूला सुद्धा टोळीतील कुणाच्याच्या बोटांचे ठसे राहू नयेत याची काळजी त्याने घेतलेली होती.

सव्वा अकरा वाजले आणि बालाजीचा नोकर पोलिसस्टेशन मधून बाहेर पडत असतानाच त्याने पाहिला. फुटपाथवर येऊन

तो आजुबाजूला पाहात असतानाच परशूने इब्राहिमला खुणावले. इब्राहिमने झटक्यात रायफल लोड केली.

इब्राहिमच्या नेमबाजीवर परशूचा पूर्णपणे विश्वास होता. अशा वेळी इब्राहिम आपल्या हातून कोणतीही चूक होऊं देत नाही हे परशूला पक्के ठाऊक होते. गोळीचा पहिला दणका उडाला... दुसरा आणि लागोपाठ तिसरा. इब्राहिमने काम फत्ते झाल्याचे एकाच शब्दात सांगितले आणि इंजिन सुरु करुन गियरमध्ये ठेवलेल्या कारने रेसमधील घोडयासारखी पुढे झेप घेतली.

रहदारीच्या गजबजलेल्या रस्त्यावरून कार परशूने भरवेगात सोडली तेव्हा त्याने आपले संपूर्ण कौशल्य पणाला लावलेले होते. मुख्य रस्ता सोडून गल्ली बोळातून तो कार पिटाळीत राहिला. वरळीत येऊन त्याने कार पूर्वीच्या जागीच दडून ठेवली. आणि निश्चितपणे आपल्या दोस्ताच्या खोलीत जाऊन झोपला.

पण का कोण जाणे समाधानाने झोप लागण्याऐवजी त्याच्या मनातील बेचैनी वाढलेली होती. पुढे काय घडेल हे त्याला कळत नव्हते. ज्या पोलिस स्टेशनसमोर आपण एक खून केला त्या पोलिस स्टेशनचे इन्स्पेक्टर उलटया काळजाचे आहेत याची परशूला जाणीव होती.

चारपाईवर पडून तळमळत असतानाच त्याच गल्लीतील एक पोरगा एक पांढऱ्या रंगाचे पाकीट घेऊन त्या घराच्या दारात आला. 'इथं परशू कोण ?' त्याने बाहेर असलेल्या जग्गूला विचारले. जग्गूची आणि त्या घरात रहाणाऱ्यांची चहा सिगरेटची गरज अधून मधून तो पोरगा भासवीत होता.

'काय झालं बाळया ?' जग्गूने दाराजवळ येत त्याला विचारले.

'हे कुणीतरी पाकीट दिलंय . . . या घरात परशू नावाचा माणूस आहे त्याला नेऊन दे असं मला सांगितलं.'

'कुणी ?' गोंधळलेल्या जग्गूने लखोटा हातात घेत विचारले. त्या पांढऱ्या लखोट्यावर फक्त परशू अशी तीनच अक्षरे होती आणि लखोट्याच्या डाव्या बाजूला खाली आंधळी न्यायदेवता आणि तराजू असे एक चित्र होते.

'मी त्याला कधीच पाहिलेलं नाही. त्यानं मला पांच रुपयाची नोट दिली.' त्या पोराने सांगितले, तोंपर्यंत संभाषण ऐकणारा परशू चारपाईवर उठून बसलेला होता.

जग्गूने लखोटा आणून परशूजवळ दिला. तो लखोटा पाहून परशू घाबरल्यावाचून राहिला नाही. आपण याठिकाणी आहोत हे टोळीशिवाय अन्य कुणालाही माहित असणे शक्य नव्हते.

त्याने लखोटा फोडला. टाईप केलेला मजकूर त्याने सावकाश वाचायला सुरुवात केली. भराभर वाचण्या इतके त्याचे इंग्रजी चांगले नव्हते. पण वाचलेले त्याला कळत होते.

पहिल्या आठ ओळी वाचताच परशू हादरला. एकाद्या बदमाषाकडे दोन न्यायाधिशाची नजर वळली तर त्याचे काय होते याची कल्पना परशूला होती. कागदाच्या शेवटी असलेली दोन न्यायाधीश ही अक्षरे वाचून तर त्याच्या अंगावर सरसरीत काटा उभा राहिला.

पाच खून आणि इतर गंभीर असे आरोप मिळून सोळा आरोप त्याच्यावर ठेवलेले होते. माफीचा साक्षीदार बनला नाही तर देहान्ताची सजा आणि माफीचा साक्षीदार बनला तर पाच वर्षांसाठी महाराष्ट्रा बाहेर असे दोन पर्याय न्यायाधिशांनी त्याच्यासमोर ठेवलेले होते.



तीन

विजय शिंदे आपली लाल रंगाची भली मोठी स्टेशनवॅगन घेऊन दादर पोर्तुगिज चर्चजवळ कुणाची तरी वाट पाहात उभा होता. विजय शिंदेची गाडी एकाद्या डिलीव्हरी व्हॅन सारखी दिसत होती: ती टेम्पोएवढी मोठी असली तरी अत्यंत वेगवान म्हणून गणली जात होती.

समोरच्याच गल्लीतून रुंद देहाचा आणि विजय शिंदेपेक्षाही उंचीने बराच कमी असलेला कैलास भानोत संथ पावले टाकीत कारजवळ आला.

'टफी, तो अद्याप घरातून बाहेर पडलेला नाही.' कैलास भानोत उर्फ टायगरने घड्याळात पाहात शब्द उच्चारले. त्यावेळी विजयची नजर घारीसारखी सभोवताली पहात बारकाईने फिरत होती.

'टायगर मला वाटतं आपल्यावर कुणाची तरी नजर असावी.'

'कशावरुन ?'

'मला स्पष्टीकरण करता येणार नाही. गाडीत बैस.' विजयचा आवाज हलका असला तरी कठोर बनलेला होता.

निदान या बाबतीत तरी टफीची चूक होणार नाही याची टायगरला पुरेपूर कल्पना होती. पाठलाग झाला तर त्याचा बास

टफीला सर्वात आधी कसा लागतो हे कोडे टायगरला अद्याप उल गडले गेलें नव्हते.

टफीने कार सुरु केली आणि हळूहळू ती मुख्य रस्त्यावर आणली. उजव्या आणि डाव्या पंख्यावर बसवलेल्या दोन्ही आरशाकडे तो बारकाईने लक्ष पुरवीत होता.

'टायगर, निळ्या रंगाची फियाट कार.' गाडी सायनकडे डाव्या बाजूला वळत असतानाच टफीने माहिती पुरवली.

'टफी, कदाचित ती कार दुसऱ्या मार्गाने निघून जाईल... सांताक्रूझकडून मागे फिरेपर्यंत कोणताही तर्क करु नकोस. कार निळी आहे हे तुला कसं कळलं?' टायगरने विचारले.

त्यावेळी रात्रीचे साडेनऊ वाजलेले होते. दिव्यांच्या उजेडात कारचा अचूक रंग ओळखता येण्याची शक्यता नव्हती.

'ती कार निळी आहे आणि आत तिघेजण बसलेले आहेत. कदाचित धूर्त परशूचा चोरावर मोर होण्याचा हेतू असावा. त्याच्या जागेवर दुसराच कुणीतरी असावा... त्यालाच तू परशू समजला असावास.' टफीने उजव्या पंख्यावरच्या आरशात बारकाईने पहात हळूहळू शब्द उच्चारले.

यानंतर टफी कांही बोलला नाही. आणि टायगरनेसुद्धा त्याला जबाब दिला नाही. आता पुढे काय घडणार आहे याची काळजी करण्याचे टायगरला कांहीच कारण नव्हते. कारण ही सारी जबाबदारी होती टफीची. कितीही सफाईने पाठलाग करणाऱ्याला धडा शिकविल्याशिवाय त्याने कधीच सोडलेले नव्हते.

ठाणे ओलांडून जुन्या रस्त्याने पनवेलकडे वळली. त्या रस्त्यावर अगदीच तुरळक रहदारी होती. या संधीचा फायदा टफी घेतल्याशिवाय राहणार नाही असा विचार टायगर करीत होता.

पाठलाग करणाऱ्या कारच्या दिव्यांचा उजेड अगदी जवळ आल्याचे टायगरच्या लक्षात आले. ती कार इतकी जवळ आलेली

आहे याचाच अर्थ ओव्हरटेक करुन पुढे जावे आणि लाल स्टेशन-वॅगन अडवावी हाच त्यांचा उद्देश असावा असे टफीला वाटले.

' टफी, त्यांच्याजवळ रायफलीसारखे विपन असावे.'

' कशावरुन ?'

' तसं नसतं तर इतक्या जवळ येण्याचा त्यानी प्रयत्न केला नसता. आमच्याबद्दल त्याना खात्री पटलेली असावी. आम्ही जिवंत राहणं धोक्याचं आहे... त्यांच्या दृष्टीने.'

' तुझी योजना काय आहे.'

' पडद्यावर पहा.' टफी मिस्कीलपणे बोलला. मागच्या कारचा वेग वाढल्याचे देखील त्यांच्या लक्षात आले.

जेव्हा मागून येणाऱ्या कारने डिपर मारुन पुढे जाण्यासाठी साईड मागायला सुरुवात केली तेव्हा टफीने आपल्या गाडीचा वेग आणखीन थोडा वाढवला. वेगाचा कांटा ऐंशी किलोमिटरवर आला. ओव्हरटेक करण्यासाठी मागची कार अगदी जवळ येऊन भिडलेली आहे हे दोघांच्याही लक्षात आले.

एकाएकी टफीने आपली गाडी अगदी उजव्या बाजूला नेली. डाव्या हाताने त्याने कारच्या मधोमध असलेले काळ्या रंगाचे एक लांबट कडे खेचले.

व्हॅनच्या मागच्या बाजूला खळखळाट झाला. मागचे दार उघडून कशावर तरी आपटले असावे असे टायगरला वाटले. दुसऱ्याच क्षणी भयानक आवाज झाला आणि मागून येणारा उजेड एकाएकी उजव्या बाजुला गर्रकन फिरल्याचे त्याला जाणवले.

टफीने हळुहळू व्हॅन थांबवली. घाईघाईत खाली उतरुन त्याने मागचे उघडलेले दार धाडकन बंद केले. पुन्हा आंत बसून त्याने कार सुरु केली.

टफी आणि टायगर पनवेलवरुन नव्या पुलावरुन पुन्हा मुंबईत येण्यासाठी निघाले. तेव्हा पाठलाग करणाऱ्या कारचे नेमके काय झालेले आहे याचा थांगपत्ताही टायगरला नव्हता.

'टफी, तू काय केलंस ?' टायगरने फारशी उत्सुकता न दाखवता विचारले. अधुन मधून टफी आपल्या व्हॅनमध्ये काही तरी करामत तयार करीत असतो याचा अनुभव टायगरने घेतलेला होता. आताही नवीन काहीतरी युक्ती त्याने काढलेली असावी.

'टायगर, वाचले तर ते नशिबवान ठरतील. ज्याठिकाणी कार कलंडली त्याठिकाणी दिडशे ते पावणेदोनशे फूट खोल आहे आणि खाली फक्त दगड आहेत. तिघेही मेले तर वाईट वाटून घेण्याचं कांहीही कारण नाही.' टफी शांतपणे बोलला.

'पण कार कोसळली कशी ?'

'लाकडाचा ओंडका पडला. स्वतःला जगवण्यासाठी काही युक्त्या कराव्या लागतात.'

टायगरने आणखी कांहीच विचारले नाही. शांतपणानें कुठेतरी बसल्यानंतर टफी आपल्याला युक्ती सांगितल्याशिवाय रहाणार नाही याची खात्री टायगरला होती.

'टायगर, आपल्याला ठाणे पनवेल या मार्गावर अडवण्याचा त्यांचा विचार होता. त्यानी आम्हाला जिवत सोडलं असतं असं तुम्हाला वाटतं ?'

'टफी, सारं कांही माझ्या लक्षात आलं... शनिवारी जे नाटक पाहिलंस ते कसं काय वाटलं ?'

'काशीनाथ घाणेकरनं तर अभिनयाची कमाल केली...' टफीने बोलायला सुरुवात केली आणि डाव्या बाजूच्या दाराकडे रेलून टायगरने डोळे मिटले.

* * *

जवळ जवळ दीडशे फूट खाली पडून कारचे छत पूर्णपणे दबलेले होते. अपघातात सापडलेल्या तिघांची प्रेते बाहेर काढता काढता पोलिसांच्या नाकी नऊ आले.

ठाणे पोलिसानी मुंबईच्या पोलिसांना या अपघाताची माहिती दिली. कार मुंबईची असल्यामूळे मुंबईच्या पोलिसांना प्रेताची ओळख पटेल असेच ठाण्याच्या लोकांचे मत होते.

कारण, अपघातात सापडलेले तिघेहीजण बदमाष आहेत याची खात्री ठाणे पोलिसाना पटलेली होती. कारमध्ये सापडलेली बेकायदेशीर रायफल व तिघांजवळ सापडलेली पिस्तूले हे एक बोलके सत्य होते.

इन्स्पेक्टर चौधरीनी तीन्ही प्रेतावरुन नजर फिरवली. त्यानी तिघानाही ओळखले. परशू कोण आहे आणि कुणाची नोकरी करतो हे चौधरीना ठाऊक होते. पण जग्गू आणि इब्राहिम या दोघांचा परशूशी संबंध काय याची मात्र कल्पना त्याना येऊ शकली नव्हती. ते दोघेही किती उलटया काळजाचे बदमाष आहेत हे चौधरीना ठाऊक होते.

चौधरीनी तिन्ही प्रेते ताब्यात घेतली. सापडलेली सारी हत्यारे एकत्र बांधली आणि मुंबईकडे निघाले. रायफल सापडल्या-मूळे ते बेहद्द खूष झालेले होते. बालाजीच्या नोकराला ठार करणारी रायफल हीच असावी असा तर्क चौधरीनी केलेला होता.

तिन्ही प्रेते पोस्टमार्टमसाठी इस्पितळात रवाना झाली. गणेशच्या शरीरात सापडलेल्या दोन गोळ्या आणि रायफल घेऊन इन्स्पेक्टर चौधरी तज्ज्ञाकडे तपासणीसाठी निघून गेले. दोन्ही गोळया त्याच रायफलमधून सुटलेल्या आहेत हे जेव्हा त्याना कळाले तेव्हा खूष होण्याऐवजी चौधरी चिंताग्रस्त बनले.

बालाजी ज्या दिवशी नाहिसा झाला त्या दिवसाच्या त्याच्या हालचालीची माहिती मिळवायलाच हवी हे आता चौधरीच्या मनात पक्के झाले.

दुपारी तीन वाजेपर्यंत त्याने आपले चौकशीचे काम आटोपले आणि ठिक सव्वासहा वाजता त्यानी आदित्य नारायणाच्या बंग-ल्यात प्रवेश केला ... पुढील चौकशीसाठी.

परशू हा आदित्य नारायणकडे नोकरी करतो हे चौधरींना माहित होते. बालाजी आदित्य नारायणाला भेटायला गेल्यानंतर परत घरी आला नव्हता. गणेशला ज्या रायफलीने ठार केले ती रायफल परशूजवळ सापडलेली होती. कदाचित बालाजीच्या टोळीने परशूवर सूड उगवला असावा असाच तर्क इन्स्पेक्टर चौधरी करीत होते.

आदित्य नारायण चिंताग्रस्त बनलेला आहे हे प्रथमदर्शनी चौधरींनी ओळखले. आपल्या येण्यामुळे ते घाबरलेले आहेत आणि गडबडून गेलेले आहेत याची देखील कल्पना चौधरींना आलेली होती.

'शेटजी, परशू हा तुमच्याकडे नोकरी करीत होता...' अत्यंत धूर्तपणाने इन्स्पेक्टर चौधरींनी सुरुवात केली. अद्याप तिघांच्याही अपघाताची बातमी बाहेर फुटलेली नव्हती. कदाचित उद्यासाठी ठाण्याच्या वार्ताहराकडून वर्तमानपत्रात बातम्या पाठविल्या जातील आणि सकाळशिवाय अपघाताची बातमी कुणालाही कळणार नाही हे त्यांनी गृहीत धरलेले होते.

'तो तर माझ्याकडेच नोकरी करतो.' आदित्य नारायणाने उत्तर दिले. उत्तर देण्यापूर्वी काही क्षण तो दचकलेला आहे हे चौधरींच्या नजरेतून सुटलेले नाही.

'सध्या तो आहे कुठं ?'

'तीन दिवसात मी त्याला पाहिलेलं नाही.'

'तो तुमचा बॉडीगार्ड आहे ?'

'तो ड्रायव्हर आहे.'

'तो रायफल वापरतो ?'

'नाही . . . . रायफलीसारखं हत्यार वापरण्याचं त्याला कारण नाही.'

'शेटजी, बालाजी शेट्टी नावाची व्यक्ती सोमवारी संध्याकाळी पाच वाजता याठिकाणी आलेली होती.'

'बालाजी ?'

'हो... काही कागपपत्र घेऊन तो आला होता. घेतलेला लिलाव त्यानं मला एका लाखाला विकला.'

'तो गेला किती वाजता ?'

'तो इथं फक्त अर्धा तास होता.'

'शेटजी, ज्या रायफलीनं बालाजीच्या नोकराचा खून झाला तीच रायफल परशुजवळ सापडली... तुम्ही काही स्पष्टीकरण करणार ?' आदित्य नारायणाच्या नजरेला नजर भिडवीत इन्स्पेक्टर चौधरींनी विचारले. ते अतिशय चिडलेले होते पण त्यांच्या चेहऱ्यावर मात्र कोणतेही भाव नव्हते.

आता मात्र आदित्य नारायण गडबडला. बसलेला धक्का त्याला चेहऱ्यावरुन दडवता आला नाही. काही गोष्टी चौधरींनी गृहीत धरलेल्या असल्यामुळे आदित्याच्या चेहऱ्यावर झालेले फेरफार पाहून त्यांना मुळीच आश्चर्य वाटले नाही.

'इन्स्पेक्टर, नेमकं काय घडलं असेल ते मला सांगता येत नाही. इथून जाताना बालाजींच्या खिशात एक लाख रुपये होते... त्या पैशासाठी परशूची बुद्धी फिरली नसेल असं मला वाटत नाही मला वाटतं...'

'काय वाटतं?'

'परशूनं कुणातरी बदमाषाला हाताशी धरुन बालाजीला गाठलं असावं. खरं सांगू इन्स्पेक्टर त्याच दिवसापासून बालाजी बंगल्यावर आलेला नाही.' आदित्य नारायणाने विचारपूर्वक आणि अत्यंत धूर्तपणाने उत्तर दिले.

त्याच्या मनातील भिती फार वेळ टिकू शकली नाही. स्वतःला कोणत्या पद्धतीने सावरायचे हे त्याने ठरवले होते. पोलिस आपल्याला हातही लावू शकणार नाही याची खात्री त्याला पटलेली होती.

'शेटजी, तुमच्यावर माझा संशय नाही. परशूच्या हातून काही घडलं तर त्याचा दोष तुमच्यावर येऊं शकणार नाही. नेमकं काय घडलेलं असेल याची माहिती मला तुमची भेट घेतल्याशिवाय मिळणं शक्य नव्हतं.'

इन्स्पेक्टर चौधरींने हळुहळू आदित्य नारायणाला बेसावध बनवले. त्याच्या मनातील सारी भीती काढून टाकली.

पण जेव्हा बंगल्यातून ते बाहेर पडले तेंव्हा आदित्य नारायणाला जाळ्यात अडकवण्याची योजना देखील त्याने आखलेली होती.



## चार

गणेश हा बालाजीकडे नोकरी करीत होता केवळ ब्लड प्रेशरच्या आजारामुळे. त्यामुळे पूर्वीसारखे कोणतेही काम त्याला आता करता येत नव्हते.

गणेशचा धाकटा भाऊ कृष्णा हा त्याच्यापेक्षा जवळ जवळ सोळा वर्षांनी लहान.

नोकरी धंद्याशिवाय आरामात कसे जगावे हे कृष्णाला आता पुरेपूर माहित होते. कुणाचीही अंदरकी बात शोधून काढायची कला त्याला उत्तम रितीने साधलेली होती. पण आपल्या धाकट्या भावाच्या जीवावर जगायला गणेश तयार नव्हता. कुठेही नोकरी करुन स्वाभीमानी जीवन त्याला आवडत होते.

दोन्ही भावांचे एकमेकावर अतिशय प्रेम होते. पोलिस स्टेशनच्यासमोर आपल्या भावाचा खून व्हावा ही घटना कृष्णाला धक्का देणारी होती. गजबजलेल्या वस्तीत आणि पोलिसस्टेशनच्या समोर आपल्या भावावर गोळ्या चालणारे बदमाष शोधून काढणे कृष्णाला अवघड नव्हते.

त्याला परशू आणि इब्राहिमचे नांव समजले. पण ही माहिती मिळायला इतका उशीर झाला होता की परशू आणि इब्राहिमवर तो सुड उगवू शकला नाही. काळानेच त्यांच्यावर सूड उगवला होता.

कृष्णाने आपले दोन साथीदार आदीत्य नारायणावर नजर ठेवण्यासाठी पेरले. बालाजीचा खून परशूनेच केलेला आहे हे समजलेले असल्यामुळे गणेशच्या खुनामागचे कारण कृष्णाच्या लक्षात येण्यासारखे होते. यामागे आदित्य नारायणाचाच हात आहे याची खात्री त्याला पटलेली होती.

इन्स्पेक्टर चौधरी आदित्य नारायणला भेटून आल्याचे समजले. पण पोलिस जेव्हा त्याचे काहीही करु शकत नाही याची जाणीव कृष्णाला झाली तेव्हा मात्र तो पेटून निघाला. आदित्य नारायणाला प्रथम पिळून काढायचे आणि एक दिवस भावाच्या खुनाचा बदला घ्यायचा हा विचार त्याच्या मनात पक्का झाला.

रात्री अकरा वाजता कृष्णाने आदित्य नारयणाच्या बंगल्याचे फाटक उघडले. त्याच वेळी कुणीतरी पोर्चजवळून आपल्याच रोखाने येत असलेले त्याला दिसले. खणखणीत आवाजात हटकणार आणि जवळ आलेला मुसा त्याने ओळखला.

' मुसा, तुझ्या मालकाला सांग मी आलोय म्हणून.' अत्यंत कठोर आवाजांत कृष्णाने हुकुम सोडला.

बंगल्यात प्रवेश करण्यापूर्वी कृष्णाने कोणत्याही प्रसंगाला तोंड देण्याची जय्यत तयारी ठेवलेली होती. कसलेले, कमावलेले

शरीर असले तरी केवळ शारीरिक ताकदीवरच विश्वास टाकायला त्याची तयारी नव्हती.

'काय काम आहे ?'

'मुसा, या चौकशा तुला नकोत... तूं आपलं काम कर.' कृष्णाला राग आवरता आला नाही.

'तूं फाटकाच्या बाहेर जाऊन उभा राहा.'

'हे बघ मुसा, तुझे हुकूम ऐकायला मी आलो नाही. शांतपणानं तुझ्या मालकाची भेट होत नसेल तर दुसराही मार्ग मला तयार करता येतो.'

मुसाने एकाएकी हालचाल केली. त्याने झटक्यात खिशातून काढलेला सुरा कृष्णाच्या नजरेतून सुटला नाही. त्याचे डोके आणखीनच फिरले. आपल्या डाव्या हाताने त्याने मुसाचे उजवे मनगट पकडले आणि उजव्या हाताने त्याने आपली मजबूत लांबसडक बोटे त्याच्या गळ्यावर आवळली.

एकाद्याचा एका हाताने खून करणे हा कृष्णाच्या हातचा मळ होता. मानेच्या मणक्यावर रुतलेली बोटे आणि गळ्याच्या पुढच्या नळीवर दाबलेला अंगठा दूर करण्याचा मुसाने आटोकाट प्रयत्न केला, पण मुसाला ते जमले नाही. काही क्षणच निघून गेले आणि उभ्या उभ्याच मुसा खाली कोसळला. उजव्या हातातील सुरा तसाच राहिला.

कृष्णाने परिस्थितीचा अंदाज घेतला. शांततेचा मुळीच भंग झालेला नव्हता. मुसा ओरडला नसल्यामुळे घडलेल्या घटनेचा थांगपत्ता बंगल्यात कुणालाही लागणे शक्य नव्हतें.

तो पोर्चमध्ये आला. कानोसा घेत त्याने दारावरची बेल दाबली. दुसऱ्यांदा बेल दाबल्यानंतर कुठल्यातरी दाराचा आवाज त्याने ऐकला. कुणाचे तरी पावलाचे आवाज दाराच्या रोखाने येत असलेले त्याला ऐकू आले. दिवाणखान्यातील दिवा पेटवला गेला

हे कृष्णाने ओळखले. दार उघडले गेले. बंगल्यात काम करणारा नोकर आश्चर्याने कृष्णाकडे पाहूं लागला.

'तुझ्या मालकाला सांग, गणेशचा भाऊ आलेला आहे म्हणून.

'बाहेर मुसा नाही ?'

'मी कुणालाही ओळखत नाही आणि मी कुणालाही भेटत नाही.' चिडलेला कृष्णा बोलत बोलत आत शिरला. दार उघडणाऱ्या नोकराला बाजूला सारुन त्याने दार आतून बंद करुन घेतले.

'इतक्या रात्री मालक कुणाला भेटत नसतात.' गोंधळलेल्या नोकराने स्वतःला सावरले.

'तूं जर जाऊन सांगत नसशील तर मी आत जातो.' कृष्णाचा आवाज चढला. त्यावेळी तो अतिजय सावध बनलेला होता. आपण किंचितही बेसावध राहिलो तर या बंगल्यातून आपण जिवंत निसटणार नाही याची खात्री त्याला पटली.

चेहऱ्यावर येणारा राग आवरीत नोकर आतल्या दारापर्यंत गेला आणि कृष्णा अलिशान सोफ्यावर जाऊन बसला. बसताना कोणत्याही दाराकडे किंवा कोणत्याही खिडकीकडे आपली पाठ राहणार नाही आणि आपले दुर्लक्ष होणार नाही याची काळजी त्याने घेतलेली होती.

दारापर्यंत गेलेल्या नोकराने गंगा हे नाव उच्चारले. कदाचित त्याने आपल्या बायकोला हाक मारली असावी अशी शंका त्याला आली. त्या नोकराला तिसऱ्यांदा हाक मारावी लागली. तेव्हा कुठे आतून भसाडा आवाज अगदी हळकाच कृष्णाच्या कानात शिरला.

'इतक्या रात्री ओरडायला काय झालंय ?' दाराजवळ येत एका धाडदांड देहाच्या माणसाने विचारले. जांभई देणाऱ्या गंगारामला कृष्णाने पहाताक्षणीच ओळखले. या गंगारामने तीन वर्षाची सजा भोगलेली आहे हे देखील त्याला आठवले. आपल्याला

आता स्वतःकडे बिलकूल दुर्लक्ष करता येणार नाही याचीही जाणीव त्याला झाली.

' हा कुणीतरी आलाय. साहेबाना भेटायला. ' त्या नोकराने सांगितले. गंगारामने डोळे वटारुन कृष्णाकडे पाहिले त्याच्या चेहऱ्यावरची चीड पहाता पहाता नाहिशी झाली.

' तू ? इतक्या रात्री इथं कुठं ?' गंगारामने आश्चर्यचकित होऊन विचारले

' गंगाराम, मी तुझ्या मालकाला भेटायला आलोय. भेट घेतल्याशिवाय जाणार नाही. ' थंड पण भेदक आवाजात कृष्णाने जाणीव दिली. गंगारामने बाजूला असलेल्या नोकराच्या चेहऱ्याकडे पाहिले.

' जा साहेबांना सांग. '

' साहेब चिडतील. '

' तू जाऊन सांग. ' गंगारामचा आवाज चढला आणि घाबरलेला नोकर मुकाट्याने आत निघून गेला.

' कृष्णा, तुझं इतक्या रात्री काय काम आहे ?'

' माझा एक मोठा भाऊ आहे हे तुला ठाऊक आहे ?'

' नाही... मी तरी कधी ऐकलेलं नाही. '

' गंगाराम, परशून ज्याला ठार केलं... इब्राहिमन ज्याला गोळ्या घातल्या तो गणेश माझा भाऊ. तुझ्या मालकाला जाब विचारायला आलोय. ' कृष्णाचा आवाज हलका असला तरी सूडाने भरलेला होता.

काहीतरी घडणार आहे हे गंगारामच्या लक्षात आले. मालकाने दिवाणखान्यात येणे धोक्याचे आहे असे त्याला वाटले. मालकाला खबर देण्यासाठी गेलेला नोकर घाईघाईत बाहेर आला. त्याला दिवाणखान्याच्या आतल्या दाराकडे उभा करुन गंगाराम आत निघून गेला. तेव्हा तो अगदी शांत बनलेला होता. कोणत्याही

परिस्थितीत कृष्णा बंगल्यातून बाहेर जाता कामा नये हाच विचार त्याने केलेला होता.

बेधडक तो जीना चढून वरच्या मजल्यावर आला. आदित्य नारायण छोटचा टॉवेलने तोंड पुशीत बाहेर येत असताना त्याने पाहिले.

' साहेब, तो कृष्णा..., गणेशचा धाकटा भाऊ तो चिडलेला आहे. तुम्ही बाहेर जाणं धोक्याचं वाटतं.' गंगारामने थोडक्यात धोक्याचे चित्र आदित्य नारायणासमोर उभे केले.

' तो काय करील असं वाटतं ?'

' साहेब, तो अत्यंत धोकेबाज आहे. तो काहीही करु शकेल. कुणालाही त्याचा थांगपत्ता लागणे कठिण. '

' तू काय करणार आहेस ?' त्याने गंगारामला विचारले.

' साहेब, त्याचा बालाजीच करायला हवा... नाहीतर निश्चित धोका आहे '

' गंगाराम, आपल्यावर चौधरीचं लक्ष वेधलेलं आहे. आपण कृष्णाचा खून केला तर चौधरीच्या मनातील आपल्याविषयीचा संशय अधिकच बळावला जाईल. '

आदित्य नारायण घाबरल्याचे गंगारामला जाणवले. कृष्णा आलेला असल्यामुळे तो घाबरलेला आहे असे मात्र गंगारामला वाटले नाही. संध्याकाळपासून आपल्या मालकाला त्याने चिंताग्रस्त अवस्थेतच पाहिलेले होते. जे आपल्याला ठाऊक नाही असे काहीतरी घडलेले असावे हाच विचार गंगारामने केला. पण विचारण्याचे धैर्य त्याला झाले नाही

' गंगाराम, पोलिसांचं लक्ष जाईल असं काही करु नकोस. मला त्याची भेट घ्यायला हवी. '

' साहेब, त्याला कमी लेखू नका. '

' मुळीच नाही. ' गंभीरपणे आदित्य नारायणने शब्द उच्चारले. घाईघाईत अंगावरचे कपडे बदलून तो दिवाणखान्यात आला.

कृष्णा सोफ्यावर आरामात बसलेला त्याने पाहिला. कृष्णाचा एकंदर रुबाब आणि त्याची ऐट पाहून आदित्य नारायणाचे डोके फिरल्यावाचून राहिले नाही.

'बोल कृष्णा, काय काम आहे ?'

'गणेशला ठार करण्याचें कारण काय ?'

'हा गणेश कोण ?'

'माझा मोठा भाऊ ... बालाजीचा नोकर.'

'मी त्याला कधीच पाहिलेलं नाही.'

'साहेब, परशूनं त्याला ठार केलेलं आहे. परशू तुमच्या हुकूमाशिवाय काहीही करीत नव्हता.'

'हे बघा कृष्णा, तुझ्या भावाचं आणि माझं कोणतंही शत्रुत्व नाही.'

'बालाजीचं आणि तुमचं तरी होतं ?'

'नाही ... आमचे चांगले संबंध होते. त्याचा खून झाल्यामुळे माझं बरंच नुकसान झालेलं आहे.'

'हे पाहा साहेब, छक्केपंजे माझ्याकडं करु नका. तुमचा बालाजी करायला मी वेळ लावणार नाही.' बोलता बोलताच शांतपणे कृष्णा उठून उभा राहिला.

कृष्णाला सर्व काही माहित असल्याचे आदित्य नारायणाला जाणवले. त्याला जिवंत सोडता कामा नये हे गंगारामचे शब्द त्याला पटले. कृष्णा जिवंत राहिला तर आपल्याला फार मोठा धोका आहे याची खात्री त्याला पटली.

'कृष्णा, माझ्याकडून तुझी काय अपेक्षा आहे ?'

'मी कोणती अपेक्षा धरावी असं तुमचं मत आहे?'

'ते मी कसं सांगणार? तूं केवळ सुड उगवायला आलेला आहेस का आणखीन काही मागण्या घेऊन हे मला कसं कळणार?'

'साहेब, तुम्ही तर सरळ सरळ कबूलीच देत आहांत.'

' मी काहीही कबूल केलेलं नाही.'

' प्रत्यक्ष नसेल .. अप्रत्यक्षपणे '

' कृष्णा तू कोणत्या ठिकाणी आहेस याची जाणीव आहे?'

' जाणीव ठेवूनच आलोय साहेब तुम्ही मला ठार केलंत तर प्रेत बंगल्याच्या बाहेर पडण्यापूर्वीच हा बंगला पोलिस ताब्यात घेतील. मी काही डोळे बंद करुन याठिकाणी आलो नाही. कृष्णाने अशा काही आवाजात शब्द उच्चारले की, आदित्य नारायण दचकल्यासारखा झाला. चमकून त्याने गंगारामकडे पाहिले

' कृष्णा, मी कबुली देत नाही. दोन्ही खुनांशी माझा काहीच संबंध नाही केवळ पोलिसाचं लक्ष माझ्याकडे जायला नको म्हणून मी तुला विचारतो . . . . तुझ्या अपेक्षा काय आहेत ?'

' दोन लाख.'

' उद्या संध्याकाळी सात वाजता ये '

आदित्य नारायणाने शब्द धूर्तपणे उच्चारलेले आहेत हे कृष्णाच्या नजरेतून सुटले नाही. कदाचित आपल्याला तो फसवण्याचा प्रयत्न करील किंवा तो पहाटेपर्यंत आपल्याला ठार 'करील याच विचारांचे थैमान त्याच्या मनात सुरु झाले.

' साहेब, या बंगल्यातून बाहेर पडल्यानंतर कदाचित मला ठार करण्याचा प्रयत्न होईल. माझा पाठलाग झाला तरी तो करणारा जिवंत राहणार नाही. एवढं लक्षात ठेवा.' दाराकडे जात कृष्णा निश्चयी आवाजात बोलला.

' कृष्णा, मी मनात आणलं असतं तर तू जिवंत बाहेर गेला नसतास एवढं लक्षात ठेव.' आदित्य नारायण शेवटच्या क्षणासाठी मनावर. ताबा ठेवू शकला नाही. दारापर्यंत गेलेला कृष्णा पुन्हा सोफ्याजवळ आला. त्यावेळी तो मंदपणे हसला.

' साहेब, तुम्ही मला काय बालाजी समजलात ? मी तुमचं आव्हान स्विकारलेलं आहे... '

आदित्य नारायणाला कृष्णाने जबरदस्त हादरा देऊन टाकला. मनात आणले असते तर कृष्णाला त्याने केव्हाच ठार केले असते, पण दोन टांगत्या तलवारी डोक्यावर असताना कृष्णाला ठार करण्याचे धैर्य त्याला होणे शक्य नव्हते. पोलिसांपेक्षाही दोन न्यायाधिशांना तो अधिक घाबरत होता. या दोन न्यायाधिशांची आपल्यावर चोवीस तास लक्ष असल्याची खात्री त्याला पटलेली होती.

'कृष्णा, जेव्हा दोन माणसं तडजोड करतात तेव्हा दोघां-नाही ताठा बाजूला ठेवावा लागतो. तुझी मागणी मी मान्य केलेली असताना सुद्धा तू टांग उचल म्हणावंस हे मला बरोबर वाटत नाही.'

'आता कसं मुद्याचं बोललात साहेब. धमक्या देऊन तुम्ही माझ्या मनावर दडपण निर्माण करु शकणार नाहीत हे तुम्हाला पटलेलं असेल. मी उद्या संध्याकाळी सात वाजता येईन साहेब.' कृष्णा बोलला पण त्याच्या आवाजातील ताठा मात्र मुळीच कमी झालेला नव्हता.

झपाझप पावले टाकीत तो दाराजवळ आला. त्याने स्वतःच दार उघडले. बाहेर जाण्यापूर्वी त्याने एकवार गंगारामकडे रोखून पाहिले. आणि बंदुकीतून गोळी सुटावी तसा तो दारातून पोर्चमध्ये आला हल्ला करण्यासाठी कुणी दडलेले असले तरी आपण बाहेर गेल्यानंतर सावध व्हावेत याच उद्देशाने हां हां म्हणता त्याने फाटक गाठले आणि ते तसेच उघडे टाकून झपाझप पावले टाकीत त्याने चालायला सुरुवात केली.



पाच

कृष्णाने दीड वाजता आपल्या खोलीचे दार उघडले. तेव्हा तो जितका खूष झालेला होता तितकाच चिंताग्रस्त बनलेला होता. दोन लाख मिळवणे जितके सोपे वाटते तितकेच ते अवघड असल्याची कल्पना त्याला आलेली होती.

त्याने दिवा लावला आणि एकाएकी तो दचकला. आपल्याच कॉटवर बसलेल्या बुरखाधारी व्यक्तिकडे त्याने पाहिले.

कॉटवर बसलेला तो माणूस शांतपणे उठून उभा राहिला. तेव्हा त्याच्या हातातील रिवॉल्वरची नळी कृष्णाच्या छातीवर रोखलेली होती. गोळीबाराचा आवाज होऊ नये म्हणून नळीला सायलेन्सर बसवलेला होता. ती व्यक्ती कृष्णाइतकीच उंचीला होती. पण कृष्णापेक्षाही रूंद होती. तो माणूस अत्यंत शक्तीमान असावा हे पाहताक्षणीच कृष्णाच्या लक्षात आले.

भपकेबाज काळ्या रंगाचा सूट त्याने अंगावर चढवलेला होता. काळ्या रंगाचा बुरखा आणि हातात काळ्या रंगाचे मोजे होते. आपण प्रतिकार करायला असमर्थ आहोत याची खात्री कृष्णाला पटलेली होती.

' कृष्णा, तू आदित्य नारायणाकडे का गेला होतास?' हलक्या आवाजात त्या अज्ञात व्यक्तीने विचारले.

'तू कोण?'

'मी एक न्यायाधीश. जे कायद्यावर मात करतात अशा गुन्हेगाराना सजा करणारा.'

'साहेब मी कसलाच गुन्हा केला नाही.'

'कृष्णा, तुझ्याविरुद्ध आमच्याकडे एकवीस गुन्ह्याची नोंद आहे. एका खून प्रकरणात मदत केल्याचाही तुझ्यावर आरोप आहे. एका वर्षापूर्वी लहान मुलाला पळवण्यात तुझा हात होता. बोल, तू आदित्य नारायणाच्या मंदिरात का गेला होतास?'

'साहेब, माझ्या भावाच्या खुनाचा बदला घेण्यासाठी.'

'बदला घेतलास?'

'नाही साहेब.'

'का?'

'साहेब, आदित्य नारायणानं अनेकाना कचाट्यात पकडून पिळून काढलेलं आहे.'

'हे सत्य आहे.'

'साहेब, त्यालासुद्धा कुणीतरी पिळून काढायला हवं असं मला वाटतं?'

'कृष्णा, खुनाचा बदला खुनानं घेतला जात नसतो... एका गुन्ह्याचा सूड दुसरा गुन्हा करून घेणं वाईट असतं.' बुरखाधारी न्यायाधिशाचा आवाज अत्यंत कठोर बनला. कृष्णा हादरला आपण हे बोलायला नको होते असें त्याला वाटलें.

'कृष्णा, आम्ही त्याच्यावर आरोप ठेवलेला आहे. लेखी कबूली जबाब देऊन त्याने आपला गुन्हेगारी माल सोडून दिला नाही तर आम्ही फाशीची सजा देणार आहोत. कितीही अट्टल गुन्हेगार असला तरी त्याला एक तरी संधी मिळायलाच हवी अस आमचं मत आहे. पुन्हा कधीच तू आदित्य नारायणाकडे जाता कामा नये.'

न्यायाधिशाच्या आवाजात धमकी होती. आपण काहीतरी हाल-चाल करावी आणि या न्यायाधिशाला अद्दल घडवावी याच विचाराचे थैमान त्याच्या मनात निर्माण झाले होते. पण धीर होत नव्हता. रिवॉल्वरची नळी इतकी स्थिर होती की, न्यायाधिशाची चूक होणार नाही हे त्याच्या मनाला पटलेले होते.

कृष्णाला खिडकीजवळ जाण्याचा हुकूम झाला न्यायाधि-शाच्या हुकूमाप्रमाणे खिडकीजवळ जाऊन बाहेर पहात तो उभा राहिला पण त्याला कसलीच हालचाल मागे दिसून आली नाही आणि न्यायाधीश कॉटजवळ काय करीत असावा हे त्याला कळू शकले नाही.

जवळ जवळ पाच मिनिटे निघून गेली. कृष्णा कंटाळला. खिडकीजवळ उभे राहून बाहेर पहाण्याची त्याची सहनशक्ती संपली. सावकाश त्याने मान वळवली. दचकून त्याने खोलीभर नजर फिरवली. आपण एकटेच आहोत हे त्याला जाणवले.

न्यायाधीश आवाज न होऊ देता खोलीतून गेला कसा हे कोडे त्याला उलगडले गेले नाही. बाहेर जाण्याचे दार तर त्याने आतून बंद करुन घेतलेले होते. ते उघडण्यात आलेले नव्हते.

घाईघाईत तो आतल्या छोट्या स्वयंपाक घरात शिरला. बाहेरच्या खोलीतून उजेड आत येत असल्यामुळे दिवा लावण्याची गरज त्याला भासली नाही. बाजूचा खिडकी सताड उघडी पाहिला आणि नकळत तो बाहेर वाकला.

न्यायाधिश कोणत्या मार्गाने गेला असेल हे त्याच्या लक्षात आले. बाहेर जाण्यासाठी त्याला इतका धोका पत्करण्याचे कारण काय हा विचार त्याच्या मनात आल्यावाचून राहिला नाही. पळून जाण्याचा प्रसंग आला असता तरी कृष्णाने खिडकीतून उडी घेऊन समोरच्या गच्चीचा काठ पकडण्याचा प्रयत्न कधीच केला नसता.

खिडकी बंद करुन तो शांतपणे बाहेरच्या खोलीत आला. त्यावेळी त्याने स्वतःला बरेच सावरले होते. न्यायाधिशाला चाब-खून आपण दोन लाखावर पाणी सोडण्याची गरज नाही हेच मनाने त्याला बजावले होते..

* * *

दोन न्यायाधिशानी पुन्हा डोके वर काढलेले आहे हे पाहून इन्स्पेक्टर चौधरी गडबडल्यावाचून राहिले नाही.

दोन न्यायाधीशानी पाठवलेले आरोप पत्र परशूच्या खिशात सापडले होते. एकूण सोळा आरोप दोन न्यायाधिशानी त्याच्यावर केलेले होते. ते आरोप पाहून चौधरीचे डोके गरगरल्यावाचून राहिले नाही. पोलिसापेक्षाही हे दोन न्यायाधिश अधिक कार्यक्षम अस-ल्याची खात्री परशूवरचे आरोपपत्र वाचून त्याना पटल्यावाचून राहिले नाही.

चौधरीनी ते आरोपपत्र तीन वेळा वाचून पाहिले. त्या सोळातील अकरा प्रसंग त्याना ठाऊक होते. पण एकाच्याही बाबतीत पोलिस परशूवर आरोप करण्याचे तर सोडाच पण त्याच्यावर संशय देखील व्यक्त करु शकले नव्हते.

एकूण पाच आरोपात आदित्य नारायणाचा उल्लेख करण्यात आलेला होता. ते पाच आरोपा दीड वर्षातले होते. शेवटचा एक आरोप होता बालाजीच्या खुनाचा. याचाच अर्थ बालाजीचा खून झाल्यानंतर पण गणेशवर गोळ्या झाडण्यापूर्वीच हा लखोटा परशूला देण्यात आला असावा असा तर्क त्याने केला.

विचारांच्या तंद्रीत असतानाच एकाएकी इन्स्पेक्टर चौधरी खुर्चीतून ताडकन उठले. घाईघाईत त्यानी हातातील कागद लखो-ट्यात सारले. तो लखोटा कपाटात बंद करुन त्याच घाईत ते ऑफिसातून बाहेर पडले.

या क्षणी आपल्या डोक्यात आलेला तर्क चुकणार नाही याच खात्रीने त्यानी मोटरसायकलीला किक मारली. भरवेगात ते निघाले. हां हां म्हणता त्यानी जुहू गाठले. मोटरसायकल आदित्य नारायणाच्या बंगल्यासमोर फाटकाबाहेर उभी राहिली.

पोर्चजवळ असलेल्या नोकराने फाटक उघडून त्याना आत घेतले. पोर्चच्या आजुबाजूला असलेल्या तीन गाड्या पाहून आदित्य नारायण बंगल्यातच असल्याची खात्री त्याना झाली. त्यावेळी सव्वा दहा वाजलेले होते.

नोकराने त्याना दिवाणखान्यात बसवले. आपल्याला पाहून तो नोकर घाबरलेला आहे हे चौधरींच्या नजरेतून सुटले नाही. आपण या नोकराला कुठेतरी पाहिलेले आहे असे सारखे वाटत असले तरी नेमके कुठे पाहिलेले आहे हे आठवले नाही.

एकाएकी ते बाजुच्या दारातून बाहेर आलेल्या दुसऱ्या नोकराकडे पहातच राहिले. आपल्याला पाहुन तोही दचकलेला आहे हे त्यांच्या नजरेतून सुटले नाही.

'गंगा तूं इथं कुठं?' स्वतःला सावरून थंड आवाजात चौधरींनी विचारले. ते शांतपणे बोलले तरी शब्दातील भेदकता त्या नोकराना जाणवल्यावाचून राहिली नाही.

'साहेब, पोटासाठी कुठंही नोकरी करावी लागते.'

'गंगा, तुझं पोट आता वाढलेलं दिसतंय.' खोचकपणे चौधरी बोलले. एक अट्टल बदमाष आदित्य नारायणच्या बंगल्यावर कसा हे कोडे उलगडले गेले नाही. गंगारामसारखा माणूस एकाद्या बंगल्यात नोकर म्हणून राहिल हे त्यांना पटणे शक्य नव्हते.

फाटक उघडलेला नोकर पुन्हा दिवाणखान्यात आला आणि तसाच घाईघाईत पोर्चमध्ये निघून गेला. त्याच्या मागोमाग भपकेबाज पेहराव केलेल्या आदित्य नारायणाने दिवाणखान्यात

प्रवेश केला. कपाळावर आठ्या आणित त्यानी चौधरीचे स्वागत केले.

'इन्स्पेक्टर, आता कसलं खापर माझ्या कपाळावर फोडणार आहांत ?' मनातल्या मनात चिडलेल्या आदित्य नारायणाला राग शब्दापासून दूर ठेवता आला नाही.

'शेठजी, दोन न्यायाधिशानी पाठवलेलं आरोपपत्र मला पाहायचं आहे.' त्यांच्या नजरेला नजर भिडवीत चौधरीनी सांगितले. आदित्य नारायण दचकल्याचे मात्र त्याच्या नजरेतून सुटले नव्हते.

'दोन न्यायाधीश ? ते कोण ?'

'ते कोण याचं उत्तर आम्हालाही देता येणार नाही. पण त्यानी एकाद्याला शिक्षा फर्मावली तर या दोन न्यायाधिशांपासून त्याला पोलिसच काय तर परमेश्वर सुद्धा वाचवू शकणार नाहीत.'

'इन्स्पेक्टर, मला वाटतं तुमची कांहीतरी चूक झालेली असावी.'

'मी भलत्याच चुका करत नसतो शेटजी.'

'पण मला कुणी कांही पाठवलेलं नाही... कुणीही माझ्यावर आरोप केलेले नाहीत. तुम्ही उच्चारण्यापूर्वी दोन न्यायाधीश हे नांवसुद्धा मी कधी ऐकलेलं नाही.'

बोलत असतानाच आदित्य नारायण सोफ्यावर बसले. चौधरीनाही त्यानी बसण्याची विनंती केली. आपण शांत रहायला हवे आणि मनावर जबरदस्त ताबा ठेवायला हवा याची जाणीव त्याला झाली. आपली बोलण्यात किंचितही चूक झाली तरी समोरचा पोलिस अधिकारी आपल्याला अचूक अडकवल्याशिवाय रहाणार नाही हें देखील त्याला पटलेले होते.

'शेटजी, तुम्ही मला दाखवलं नाही तरी फारसा फरक

पडणार नाही. दोन न्यायाधिशांच्या हातून कुणी सुटलेला आहे असं मला तरी वाटत नाही. निदान मरताना तरी तुम्हाला जाणीव होईल.'

'कसली ?'

'मदतीच्या अपेक्षेने मी आल्याची.

'इन्स्पेक्टर, उगाच मला धमकावण्या देण्याचा प्रयत्न करू नका. पुन्हा तेच सांगतो... दोन न्यायाधिश हे नाव मी पूर्वी ऐकलेलं नाही.'

'वाचलं तरी असेल?'

'नाही.'

'तुम्ही वर्तमानपत्र वाचत नाहीत?'

'नाही.'

आदित्य नारायणाशी घोळ घालीत बसण्यात आपण वेळ घालवू नये असा विचार करीत चौधरी उठले. ते ऑफिसात आले तेव्हा जेवणाची वेळ झालेली होती. त्यांनी निवडक चार शिपायांना बोलावले. त्यांना सविस्तरपणे सूचना दिल्या.

चौघेही निघून गेले आणि घरी जाण्यासाठी इन्स्पेक्टर चौधरींनी मोटारसायकल सुरु केली.



## सहा

मुदत संपली . . . दोन न्यायाधिशानी दिलेली. दोन न्यायाधिशाना तोंड देण्याची समर्थपणे त्यानी तयारी ठेवलेली असली तरी मन गडबडल्यावाचून राहिले नाही.

दोन न्यायाधिशांकडून आलेल्या आरोपपत्राची माहिती त्यांच्याशिवाय अन्य कुणालाही नव्हती. असे असताना इन्स्पेक्टर चौधरीपर्यंत न्यायाधिशाकडून आलेल्या आरोप पत्राचा वास जावा तरी कसा हे कोडे उलगडले गेले नव्हते. सुरुवातीला घाबरलेला आदित्य नारायण नंतर मात्र हळूहळू बेडर बनला.

गंगारामवर त्याचा पुर्णपणे विश्वास होता. परशूपेक्षाही हा माणूस शूर आहे याची खात्री त्याला होती. दोन न्यायाधीश कोणत्याही परिस्थितीत दिलेल्या मुदतीत आपल्याला हात लावू शकणार नाही असेच त्याचे ठाम मत होते.

न्यायाधिशानी दिलेली मुदत रविवारी संध्याकाळी सात वाजता संपत होती. सात वाजेपर्यंत मरायचे किंवा जगायचे हा निर्णय घेणे त्याला जरुरीचे होते. दोन न्यायाधिशांची एकही अट मानायची नाही आणि तरी जगायचे याच जिद्दीने तो पेटून निघाला होता.

आणि इतका निश्चय करुन संध्याकाळचे सहा वाजले आणि

त्याच्या मनातील बेचैनीला सुरुवात झाली. आपल्या खास खोलीत विमनस्कपणें येरझारा घालीत तो भिंतीवरच्या घड्याळाकडे दर एक दोन मिनिटांनी रोखून पाहूं लागला. पुढे सरकणारी मिनिटे त्याच्या हृदयाचे ठोके वाढवूं लागली.

दोन न्यायाधिशांच्या अटी मानलेल्या आहेत हें न्यायाधीशाना कळण्यासाठी बंगल्याच्या फाटकाबाहेर जाऊन ठीक सात वाजता उभे राहणे आणि पांढरा रुमाल किंवा पांढरे फडके डाव्या हातात घेऊन ते स्वत:च्याच डोक्याच्या वरच्या बाजूला हलवणे ही साधी खूण त्याच्यासाठी दिलेली होती.

पण स्वाभीमानी आदित्य नारायण माघार घ्यायला तयार नव्हता. आपल्याला मृत्यूचा धाक दाखवून पिळून काढण्याचा प्रयत्न कुणीतरी बदमाष करीत असल्याची समजूत त्यानें करुन घेतलेली होती. आपण पोलिसाना देखील भिक घालीत नाहीत... बदमाषांना घाबरणे हे भेकडपणाचे आहे अशी त्यांची समजूत होती.

सात वाजायला पाच मिनिटे होती आणि त्याच्या मनात विचाराचे वादळ उठले. दोन मनाचे द्वंद्व सुरु झाले. जे न्यायाधीश आपल्याला ठाऊक नाही अशाशी स्पर्धा करणे कितपत योग्य आहे हें तो मनाला विचारुं लागला. इन्स्पेक्टर चौधरीचे शब्द त्याच्या मनात भांगडा नृत्य करुं लागले.

सात वाजले. पाहता पाहता त्याच्या मनातील संघर्ष नाहिसा झाला. शांतपणे तो भल्या मोठ्या खुर्चीत येऊन बसला. गंगारामला बोलवावे आणि दोन न्यायाधिशाचा उल्लेख न करता कडक बंदोबस्ताची सूचना द्यावी हा विचार त्याने केला. शांत झालेल्या डोक्याने त्याने पंधरा मिनिटात स्वत:ला कसेबसे ठिकाणावर आणले आणि त्याचवेळी दाराच्या आतल्या बाजूला असलेला लाल दिवा पेटला.

दाराबाहेर गंगाराम किंवा आपला नोकर आलेला असावा असा विचार करीत तो खुर्चीतून उठला. शांतपणें तो दाराजवळ

आला. दार उघडण्यासाठी तो एक बटन दाबणार तोच झटका बसल्यागत त्याचा हात मागे आला. बाहेर दोन न्यायाधीश तर आले नसतील ना हा विचार मनात येताच त्याचे संपूर्ण शरीर थरारल्यासारखे झाले.

पुन्हा तो टेबलाजवळ आला. त्याने इंटरकॉमचा रिसिव्हर उचलला. जवळ जवळ अर्धे मिनिट गेले आणि पलिकडून त्याच्या नोकराचा आवाज ऐकू आला:

'साहेब, कुणीतरी एक पांढरा लखोटा आणून दिलेला आहे.'

'कुणी ?'

'साहेब, समोरच्या बाजूला तो शहाळी विकतो त्याच्याकडं तो पोरगा काम करतो. लखोटयावर फक्त तुमचंच नांव आहे.'

आदित्य नारायणाने रिसिव्हर खाली ठेवला आणि घाईघाईत दार उघडले. दार बंद असताना तो बाहेरच्या नोकराला काहीच विचारुं शकत नव्हता. त्या खोलीत बंदूकीची गोळी झाडली तरी तो आवाज दाराबाहेर जाऊं शकणार नाही अशी खास व्यवस्था केलेली होती. नोकराने दिलेला लखोटा घेऊन आदित्याने पुन्हा दार बंद केले. डाव्या बाजूच्या कोपऱ्यावर असलेले चित्र पाहून नकळत त्याच्या शरीराला कंप सुटला.

थरथरत्या हातानी आदित्य नारायणाने लखोटा फोडला. पांढऱ्या कागदावर निळ्या शाईने एकच ओळ लिहीलेली होती. उद्या मध्यरात्री ठिक बारा वाजता दोन न्यायाधिशाकडून आपल्याला फासावर चढवण्यात येणार आहे. हे वाचताच त्याच्या शरीराचा थरकांप अधिकच वाढला.

त्या एका ओळीखाली दोन न्यायाधीश अशी अक्षरे होती आणि त्याखाली आजची तारीख आणि सात वाजून दोन मिनिटे अशी वेळ होती.

सतरा तासाने आपल्या शिक्षेची अंमलबजावणी होन न्यायाधिश करणार आहेत या विचाराने त्याचे डोके देखील फिरल्यासारखे झाले.

स्वत:ला दोन न्यायाधीश म्हणवणारे हे बदमाष स्वत:ला समजतात तरी कोण? त्याचे मन जोरात ओरडले. त्यानी तो लखोटा टेबलाच्या तळाच्या खणात टाकून दिला.

आणि शांतपणे तो खोलीतुन बाहेर पडला.

'साहेब, बाहेर कृष्णा आलाय.' तो खोलीतून बाहेर पडता पडताच गंगारामचे शब्द त्याच्या कानात शिरले. दचकून त्याने सांगणाऱ्या गंगारामकडे पाहिले. कारण, आज संध्याकाळी आपण कृष्णाला बोलावलेले आहे याचा त्याला पूर्णपणे विसर पडलेला होता.

दोन न्यायाधिशानी निर्माण केलेल्या दडपणामुळे कृष्णाचा काटा काढण्याची योजना त्याच्या मनातूनच गेलेली होती. कोणत्याही परिस्थितीत तो आज सात वाजेपर्यंत येऊ नये ही योजना मनात आखलेली असून देखील तिची अंमलबजावणी करण्याचे भान दिवसभरात त्याला उरलेले नव्हते.

* * *

ठिक चार वाजता कृष्णा आपल्या खोलीतून बाहेर पडला. तोंड लपवणाऱ्या न्यायाधिशाचे आपण काहीही ऐकतां कामा नये हे तर त्याने सुरवातीलाच ठरवलेले होते. आपण रात्रीच्यासारखे बेसावध न रहाता पावलो पावली सावधगिरी बाळगली तर न्यायाधिशाला घाबरण्याचे कारण काहीच नाही याची खात्री त्याला पटली होती. त्याची मोटरसायकल सायनहून बांद्रा ईस्टकडे जाणाऱ्या नव्या रस्त्यावर वळली आणि त्याचवेळी आपला पाठलाग होत असल्याची जाणीव त्याला झाली. आपला पाठलाग करणारा मोटरसायकलस्वार त्याने नीट नजरेने टिपला.

तीच मोटारसायकल आणि तोच माणूस सकाळी साडेआठ वाजता त्याच्याच घराच्या खिडकीवर नजर ठेवून होता. हॉटेलात त्याच्याच शेजारच्या टेबलावर बसून त्या माणसाने जेवण घेतलेले होते जेव्हा तो चार वाजता आपल्या मोटारसायकलीवरून फडके फिरवीत होता तेव्हा हाच पाठलाग करणारा माणूस कृष्णाने आपल्यापासून थोड्या अंतरावर राहून सिगरेट ओढताना पाहिला होता.

आणि आता तोच माणूस आपल्या मागून येत असल्याचे पाहून कृष्णाचे डोके फिरले. दिवसाढवळ्या त्याला भररस्त्यावर आडवे करावे असाही विचार कृष्णाच्या मनात आला. पण त्याने स्वतःला कसेबसे सावरले.

पाठलाग करणाऱ्याने स्वतःचे अस्तित्व दडवण्याचा प्रयत्न मुळीच केलेला नव्हता. इतक्या राजरोसपणाने आपला पाठलाग करणारा हा माणूस आपल्यापेक्षाही अधिक सावध असेल हेच त्याने गृहीत धरले. वेगळ्याच विचारांचे थैमान त्याच्या मनात सुरू झाले.

तो पोलिसांचा माणूस असेल असे त्याला सुरवातीला वाटले. पण नंतर मात्र तो माणूस पोलिसांचा नाही याची खात्री त्याला पटली कदाचित दोन न्यायाधिशांनी आपल्यावर नजर ठेवली असावी अशी शंका त्याला चाटून गेली. कदाचित गंगारामने आपल्यावर हल्ला करण्याची योजनाही आखली असावी असा विचार त्याने केला. आणि हाच शेवटचा विचार त्याला योग्य वाटला. इथेच त्याचे डोके फिरले. त्याने मोटारसायकल एका पोस्टाच्या पेटीजवळ उभी केली. आता आपल्याला अत्यंत धूर्तपणाने प्रत्येक पाऊल टाकावे लागेल हा निर्णय त्याने घेतला. सावधगिरीपेक्षा आपल्याला धूर्तपणा अधिक हात देईल असे त्याला वाटले. पत्र लिहिण्यासाठी आणलेला एक कोरा लखोटा त्याने पेटीत सारला. आणखीन पधरा मिनिटांनी ती पेटी उघडण्यात यईल हे पेटीवर

असलेली वेळ पाहून कृष्णाच्या लक्षात आले. शांतपणे हसत त्याने पुन्हा मोटरसायकल सुरु केली.

आता पाठलाग करणाऱ्याकडे लक्ष देण्याचे त्याला काहीच कारण नव्हते. जुहू बिचवर आदित्य नारायणच्या बंगल्यापासून कांही अंतरावर त्याने मोटार सायकल उभी करुन ठेवली. मनगटावरच्या घड्याळात पाहात तो वाळू तुडवीत थोडा पुढे जाऊन बसला. बराच वेळ त्याने आजुबाजूला दूरवर नजर फिरवून पाहिले पण पाठलाग करणारा मात्र दिसला नाही. पावणेसात वाजता तो पुन्हा मोटारसायकलीजवळ आला. मोटरसायकल सुरु करण्यापूर्वी जवळजवळ दहा मिनिटे त्याने नीट निरिक्षण केले. आपला पाठलाग करणारा निघून गेला असेल यावर मात्र त्याचा विश्वास बसणे शक्य नव्हते आपण कुठे जाणार आहोत हे माहित असल्यामुळेच कदाचित तो निघून गेला असावा अशीच शंका त्याच्या मनात उभी राहिलेली होती. आणि म्हणूनच तर पाठलाग करणारा माणूस आदित्य नारायणाचाच असावा हा संशय त्याच्या मनात बळावलेला होता.

त्याने बंगल्याच्या फाटकाबाहेर मोटारसायकल उभी केली तेव्हा ठिक सात वाजले होते. कुणाची तरी नजर बंगल्यावर असावी हा विचार उगाचच त्याच्या मनात आला. दूरवर असलेली दोन माणसे आपल्याकडेच लक्ष पुरवीत असल्याचा भास कृष्णाला होत राहिला तो विचारांच्या तंद्रात असतानाच एक चौदा पधरा वर्षाचा मुलगा फाटक उघडून बेधडक आत शिरला. या मुलाच्या हातात एक पांढऱ्या रंगाचा लाबट लखोटा असल्याचेही कृष्णाने पाहिले तो पोरगा बाहेर निघून जाईपर्यंत आपण थांबावे असे त्याला वाटले.

बंगल्याच्या दारापर्यंत गेलेला तो पोरगा लखोटा देऊन तसाच घाईघाईत फाटकातून बाहेर पडला. कृष्णाने आणखीन पाच-मिनिटे जाऊ दिली. आणि फाटक आणखीन थोडे उघडे करुन

कृष्णाने पोर्चच्या दिशेने चालायला सुरुवात केली.

बंगल्याचें दार उघडेच होते. गंगारामनेच त्याचे स्वागत केले. त्याच्या वागण्यावरुन काहीतरी काळेबेरें असावे अशी शंका कृष्णाला आली. पण मृत्यूची कधीच भीती वाटली नाही असा कृष्णा कोणत्याही धोक्याच्या जाणीवेनें दबून जाणे शक्य नव्हते. धोका पत्करणे हे तर त्याच्या रक्तातच मुरलेले होते.

'कृष्णा, साहेब तुझीच वाट पाहात आहेत.'

'या माहितीबद्दल मी तुझा अत्यंत आभारी.' कृष्णा खोचकपणाने बोलला. आणि गंगाराम त्याला दिवाणखान्यात सोडून आतल्या भागात निघून गेला. पण आपण याठिकाणी एकटे नाही, कुणीतरी आपल्यावर नजर ठेवीत आहेत हे मनाने त्याला बजावले, पण कृष्णाला काहीच वाटले नाही.

दोन तीन मिनिटानी गंगाराम आला. त्यावेळी मात्र त्याचा चेहरा गंभीर बनलेला कृष्णाने पाहिला.

'कृष्णा, तुला साहेब आंत बोलावतात.'

'गंगा, आता चालबाजी बस्स झाली. आत जाऊन तुझ्या मालकाशी बोलण्यासारखं काहीहा शिल्लक राहिलेलं नाही. मी कशासाठी आलो हे त्याना माहित आहे'

'कृष्णा, समज तुझ्यावर त्याना एकादी कामगिरी सोपवायची असली तर ?'

'निदान आज तरी मला तुझ्या मालकाशी बोलायचं नाही. काही बोलायचंच असेल तर उद्या दिवसाढवळ्या मी येईन.'

'याचा अर्थ काय ?'

'मला बालाजी बनायचं नाही.'

गंगारामचा चेहरा पूर्वीपेक्षाही अधिक गंभीर बनला. मुकाट्याने तो पुन्हा आत निघून गेला.

कोणत्याही परिस्थितीत दिवाणखाना सोडायचा नाही याची

खुणगांठ त्याने मनाशी बांधलेली होती. आदित्य आणि गंगाराम हे दोघेही आपल्याला जाळ्यात अडकवण्याचा प्रयत्न करणार नाहीत यावर त्याचा मुळीच विश्वास नव्हता. आपण कितीही सावध असलो तरी जोपर्यंत या ठिकाणचे डावपेच कळत नाहीत तोपर्यंत आपल्या सावधगिरीला काहीच अर्थ नाही हे सुद्धा त्याला कळून चुकलेले होते.

' कृष्णा, तू फार हट्टी आहेस ' अचानक दिवाणखान्यात प्रवेश करीत आदित्य नारायणाने शब्द उच्चारले.

' साहेब, मी हट्टी नाही. शेवटी माणसाला जगण्यासाठी काही-तरी करावं लागतंच .. तेच मी केलं.'

' कृष्णा, सध्या तू काय काम करतोस ?' सोफ्यावर बसत आदित्य नारायणाने विचारले आणि बसलेला कृष्णा ताड्कन उठून उभा राहिला. तेवढा तरी मान आदित्य नारायणाला देणे आपले कर्तव्य आहे असे त्याला वाटले.

' साहेब, कुणाचंही काम मी करतो. नेहमीच कामं मिळतात असं नाही. सध्या मला कसलंच काम नाही.'

' कृष्णा, परशूने बालाजीला ठार केलं हे सत्य आहे. बालाजी मेला नसता तर मी मेलो असतो. त्याने माझ्यावर पिस्तुल रोखलेले होते. ऐनवेळी परशूने सुरा फेकला नसता तर बालाजीनं माझ्यावर गोळी झाडली असती.' शांतपणे आदित्य नारायणाने सांगितले. तो कबूली जबाब ऐकून कृष्णा दचकला.

' आणि कृष्णा, गणेश हा तुझा भाऊ आहे किंवा नाही हा भाग वेगळाच. तो पोलिसांकडे गेला होता हे सत्य आहे. बालाजी माझ्याकडे आला होता हे त्याला माहित असलंच पाहिजे. स्वतःच्या संरक्षणासाठी मी गणेशचा बंदोबस्त करण्याचा हुकूम सोडला. '

कृष्णा हादरला. हे सारे सांगण्यामागे आदित्य नारायणाचा

हेतू काय आहे हेच मुळी कृष्णाच्या लक्षात आले नाही. हेतू चांगलाच असेल असेही गृहीत धरायला त्याचे मन तयार नव्हते.

'कृष्णा, तूं समजुतदार आहेस. माझ्या जागी तूं असतास तर काय केलं असतंस ?' थोडा वेळ थांबून कृष्णा काहीच बोलत नाही हे पाहून आदित्य नारायणाने विचारले.

'साहेब, मला त्याच्याशी काहीच देणं घेणं नाही. मी गणेशचा धाकटा भाऊ. तुमचा माझा तर काहीच संबंध नाही. अशा परिस्थितीत माझ्या जागी तुम्ही असता तर काय केलं असतं ?' कृष्णाने उलट विचारले.

'मी माझ्या भावाच्या खुनाचा बदला घेण्याचा प्रयत्न केला असता.'

'मी तेच म्हणतो साहेब. पण मी तसं केलं नाही. केवळ या घटनेचा फायदा उठवावा असं मला वाटलं तर तुम्ही दोष देऊ शकणार नाही.'

'नाही कृष्णा... तुला कोणीही दोष देऊं शकणार नाही.'

'साहेब, माझ्या कामाची तुम्ही चौकशी करीत होता' कृष्णाने स्वतःला सावरले. या ठिकाणी आपण भावनाप्रधान बनणे योग्य नाही असा विचार त्याने केला.

'हे बघ कृष्णा, परशू माझा उजवा हात होता. माझी काळजी तोच घेत होता. मी त्याला स्वातंत्र्य दिलेलं होतं. माझी इच्छा नसतानाही त्याने बालाजीला ठार केलं... मी काहीच बोललो नाही. त्याने गणेशला गोळ्या घातल्या हे दुसऱ्या दिवशी मला समजलं तेही या गंगारामकडून.' बोलता बोलताच आदित्य नारायणाने गंगारामकडे पाहिले.

कृष्णाशी आपण बोलत असताना गंगारामने जवळ उभे असणे त्याला योग्य वाटले नाही. कृष्णालासुद्धा मोकळेपणाने बोलता येणार

नाही हा विचार सुद्धा त्याच्या मनात आला. नजरेचा इशारा होताच गंगाराम घाईघाईत आत निघून गेला.

'कृष्णा, परशूसारख्याच शूर आणि हुशार माणसाची मला गरज आहे. तूं हुषार आहेस. परशूपेक्षाही शूर असल्याचं मला पटलेलं आहे. तूझ्या जागी परशू असता तर सिंहाच्या गुहेत शिरण्याचं धाडस त्यानं केलं नसतं.'

आदित्य नारायण थांबला. कृष्णाकडून कोणती प्रतिक्रिया व्यक्त होते हेच त्याला पहायचे होते. पण तीन मिनिटे निघून गेली तरी कृष्णाने एकही शब्द उच्चारला नाही.

'कृष्णा, माझ्या बोलण्याचा अर्थ तुला कळला?'

'हो ... समजला साहेब.'

'तूं आज रात्रभर विचार कर. तुझ्या मनाची तयारी झाली तर उद्या दुपारपर्यंत याठिकाणी ये. धोक्याचा विचारसुद्धा मनात आणू नकोस. आपल्यासारखी माणसं जेव्हा एकमेकाना शब्द देतात तेव्हा तो मोडण्याचं धाडस दोघांतील कोणालाही होत नसतं.'

'मी विचार करीन साहेब.'

'हे बघ कृष्णा, तुला आठवड्याला तिनशे रुपये मिळतील. तुझ्या घरचं भाडं मिळेल. या बंगल्यात तुझ्यासाठी एक खोली राखून ठेवली जाईल. जेवणा खाणाचा तर प्रश्नच नाही. तुला कार वापरता येईल. आता आहेस त्याहून आरामात तुला राहाता येईल.'

'मी उद्या दुपारपर्यंत माझा निर्णय जरूर कळविन.' कृष्णा बोलून गेला. पण ही संधी सोडायची नाही हा निश्चय देखील त्याने केलेला होता.

दोन न्यायाधिशांची टांगती तलवार आदित्य नारायणच्या डोक्यावर आहे हे त्याला माहित होते. त्यांच्यापासून बचाव

करण्यासाठीच त्याला आपली गरज आहे याचीसुद्धा कृष्णाला खात्री पटलेली होती

आदित्य नारायण घाईघाईत आत निघून गेला. सुमारें पाच मिनिटाने तो बाहेर आला. तेव्हा एक ब्रिफकेस त्याच्या हातात होती. ती त्याने कृष्णाजवळ दिली.

'कृष्णा, दहा हजारांचे एक अशी बीस बंडलं त्यांत आहेत.' आदित्याने सांगितले.

आणि हलक्या मनाने कृष्णा तिथुन बाहेर पडला ... तेव्हा आपल्यापुढे कोणते ताट वाढून ठेवलेले आहे याची कल्पनाही त्याला नव्हती.



## सहा

इन्स्पेक्टर चौधरींनी आणखीन तीन माणसे पकडली. इब्राहिमच्या टोळीत ते बदमाष काम करीत होते. त्या तिघानीही परशू आणि इब्राहिम या दोघानी बालाजीचे प्रेत टाकल्याचे कबूल केले. गणेशवर गोळ्या इब्राहिमने झाडल्याची कबूली दिली. पण परशूने हे सारे कुणासाठी केले याचा थांगपत्ता मात्र इन्स्पेक्टर चौधरीना लागला नाही.

त्यांचे संपूर्ण लक्ष आदित्य नारायणवर केन्द्रीत झालेले होते. त्याला अडकवण्यासाठी पुरावा गोळा करण्याचा सपाटा त्यांनी

लावलेला होता. कोणत्याही परिस्थितीत एक दोन दिवसात आपण आदित्य नारायणाला पकडायला हवे असे
आपण त्याला अडकवू शकू याचा विश्वास त्यांना वाटत होता.

बालाजीकडून त्याने लिलावाचे कागदपत्र आणि स्वत:साठी अधिकार घेतलेला आहे हे सत्य होते. बालाजीवर दडपण आणून त्याच्याकडून बळजबरीने सह्या घेतल्या नसतील यावर कुणाचाही विश्वास बसणे शक्य नव्हते. परशुनेच बालाजीच्या नोकराचा खून आपल्या विरुद्धचा पुरावा दडपण्यासाठीच केलेला आहे हे उघड सत्य होते. आदित्य नारायणाच्या बंगल्यावर धाड घातली तर बऱ्याच गोष्टी उघडकीला येतील हे सुद्धा चौधरिनी गृहीत धरलेले होते.

त्यांची विचारांची तंद्री भंग पावली. घाईघाईत त्यानी रिसीव्हर उचलला. त्यावेळी सव्वा सात वाजलेले होते. आदित्य नारायणाचे प्रकरण हातात नसते तर एव्हाना चौधरी घरी गेले असते.

‘ हॅलो... मीच बोलतो. ’ आपल्याच हवालदाराचा आवाज चौधरींनी लगेच ओळखला.

‘ साहेब, कृष्णा बंगल्यात गेलेला आहे.’

‘ किती वेळ झाला.’

‘ फार तर पाच सात मिनिटे झाली.’

’ मी लगेच निघतो... मी येण्यापूर्वी जर तो निघाला तर त्याला अटक करा.... पण कोणताही धोका पत्करु नका... तो अत्यंत धोकेबाज आहे ’

‘ साहेब, अटक करुन त्याला नेऊ कुठं ?’

‘ तिथल्याच पोलिस स्टेशनवर न्या... मी फोनवरुन मदत पाठवतो. ’ घाईघाईत चौधरींनी सांगितले आणि रिसिव्हर खाली ठेऊन दिला.

कृष्णा हा गणेशचा धाकटा भाऊ आहे हे इन्स्पेक्टर चौधरींना माहित होते. केवळ पुरावा नष्ट करण्यासाठी परशूच्या सहाय्याने आदित्य नारायणाने त्याला ठार केलेले आहे हे चौधरी अगदी सहज रितीने सिद्ध करू शकत होते.

घाई-घाईत त्यांनी जुहूच्या पोलिसस्टेशनला फोन केला चार पांच पोलिस घेऊन सबइन्स्पेक्टरने आदित्य नारायणाच्या बंगल्यासमोर जात असल्याचे सांगितले. घाई-घाईत रिसिव्हर खाली ठेवून चौधरी बाहेर आले. जीपच्या ड्रायव्हरला त्यांनी ओरडूनच सूचना केल्या. भरवेगात जीप जुहूला जाण्यासाठी निघाली तेव्हा रस्त्यावरची रहदारी मी म्हणत होती आणखीन पोलिस बरोबर घेण्याची त्याला मुळीच गरज नव्हती.

जीप जुहूला पोचली. प्रथम पोलिस स्टेशनवर त्यांनी चौकशी केली. सबइन्स्पेक्टर अद्याप आलेला नाही हे कळताच ते आदित्य नारायणच्या बंगल्याजवळ आले. जीप बंगल्यापासून फर्लांगभर अंतरावर ठेऊन ते फिरत फिरत बंगल्यासमोर येऊन पोचले. घाई-घाईत आलेल्या हवालदाराने त्यांना गाठले आणि एका आडोशाला उभा असलेला सबइन्स्पेक्टर सुद्धा त्या ठिकाणी येऊन पोचला. कृष्णा अद्याप बंगल्यातून बाहेर आलेला नाही हे रखवालदाराने सांगितले आणि सर्वांनीच बंगल्याच्या फाटकाजवळून कुणालाही दिसू शकेल अशा जागी पांगलेल्या अवस्थेत राहण्याच्या सूचना चौधरींनी दिल्या.

ते स्वत: कृष्णाच्या मोटारसायकलीजवळ आले. फाटकाच्या समोर असलेली मोटारसायकल त्यांनी थोडी बाजूला नेऊन उभी केली आणी आरामात एक पाय वर करुन ते दोन्ही सिटवर कृष्णाची वाट पाहात आरामात बसले.

आदित्य नारायणाला भेटण्यासाठी आपण हीच संध्याकाळची वेळ निवडली असती तर बरे झाले असते असे आता कुठे चौधरींना वाटले. मुसाचे प्रेत सापडल्यानंतर आदित्य नारायणाची भेट

घ्यायलाच हवी असा विचार त्यानी केलेला होता. आपण संध्याकाळी जावे असेही त्यानी ठरवलेले होते, पण त्यातून फारसे काही निष्पन्न होईल असे मात्र त्याना वाटत नव्हते.

मुसा आदित्य नारायणाच्या बंगल्यावर त्यानी पाहिलेला होता त्याच्या हातात सुरा होता. मान मोडल्यामुळें त्याला मृत्यू आलेला आहे असे डॉक्टरचे मत होते.

इन्स्पेक्टर चौधरी विचारांच्या धुंदीत असतानाच अर्धवट उघडच्या फाटकातून बाहेर आलेल्या कृष्णाकडे त्यानी पाहिले. आपली मोटरसायकल जाग्यावर नाही हे पाहून कृष्णा गोंधळला. चौधरीकडे नजर जाताच गोंधळलेला कृष्णा दचकला आणि त्याच वेळी त्याची नजर रस्त्याच्या पलिकडच्या बाजूला असलेल्या सबइन्स्पेक्टरवर पडली. एकेका पोलिसावरुन नजर फिरवित त्याने ती मोटरसायकलीवर बसलेल्या चौधरीवर स्थिर केली.

तो गांगरला. पळून जाण्याशिवाय गत्यंतर नाही असे त्याल वाटले. हातातील ब्रिफकेस त्याने दोन्ही हाताने गच्च पकडली. कोणत्याही परिस्थितीत आपण पळून जाऊं शकणार नाही याची खात्री त्याला पटली. झक मारली आणि आपण आताच नोटा घेऊन बाहेर पडलो हा विचार त्याच्या मनात आला.

'कृष्णा, पळून जाण्याचा प्रयत्न करुं नकोस.' मोटारसायकलीवरून खाली उतरत चौधरीनी खणखणीत आवाजात बजावले. कृष्णा खरोखरीच हादरला. त्याच्या शरीराला कंप सुटला. पुन्हा संधी मिळते का हे पाहण्यासाठी त्याने चौफेर नजर घुमवली. त्याची निराशा झाली.

'इकडं ये कृष्णा' इन्स्पेक्टर चौधरीचा हुकूम झाला. घाबरलेला कृष्णा जड पावलानी मोटारसायकली जवळ आला.

'काय झालं साहेब. घाबरलेल्या कृष्णाने विचारले.

'तुला माझ्याबरोबर यावं लागेल.'

' कशासाठी साहेब.'

' चौकशीसाठी तू हवास.'

' कसली चौकशी साहेब?'

बोलत बोलतच चौधरींनी त्याला पकडून मोटारसायकलीपासून दूर नेले. त्याचवेळी एक जीप संथपणे त्यांच्याजवळ येऊन उभी राहिली. इन्स्पेक्टर चौधरींचाच ड्रायव्हर ती जीप चालवित होता.

' हे बघ कृष्णा, तूं शांतपणानं माझ्याबरोबर आलास तर तुला कोणताही त्रास होणार नाही, आजपर्यंत माझ्या हातून कुणीही निसटलेला नाही हा इतिहास तुला बदलता येईल यावर माझा विश्वास नाही.' वेगळ्या शब्दात चौधरींनी त्याला जाणीव दिली.

' मला पळून जाण्याची गरज काय साहेब ?' कृष्णाने आता स्वत:ला सावरले. आपण डोके शांत ठेवले तरच या कोंडीतून सहीसलामत आपल्याला बाहेर पडता येईल असाच विचार त्याने केला. मुकाटयाने तो जीपच्या मागच्या बाजूला जाऊन बसला. हवालदार आणि दोन पोलिस मागच्या बाजूला चढले.

कृष्णाची मोटारसायकल जुहू पोलिसांच्या ताब्यात देऊन चौधरी निघाले त्यावेळी ते कृष्णाच्या शांतपणाचा विचार करीत होतें. तो भावांच्या खूनाचा सूड उगविण्यासाठी आदित्य नारायणाच्या बंगल्यावर गेलेला असावा असेच चौधरींनी गृहीत धरलेले होते. कदाचित तो बंगल्यातून बालाजीप्रमाणेंच बाहेर पडेल, असाही तर्क त्यांनी केलेला होता. हातातील ब्रिफकेस त्याने जीवापलीकडे सांभाळण्याचे कारण काय असाही प्रश्न ते स्वत:ला विचारीत होते.

पावणे बारा वाजता चौधरी कृष्णाला घेऊन पोलिस स्टेशनवर आले. आपल्या केबिनमध्ये नेऊन त्यांनी प्रथम त्याच्या खिशातील साऱ्या वस्तू काढून घेतल्या. ब्रिफकेस उघडुन पाहिली, पण आत

असलेले दोन लाख पाहुन त्यांना मुळीच आश्चर्य वाटले नाही. तोंड बंद करण्यासाठी आदित्य नारायणाने दोन लाखांचा सौदा केलेल आहे याची खात्री त्याला झाली.

'कृष्णा, हे पिस्तूल बेकायदेशीर आहे. हा सुरा .... या दोन वस्तू तुला किमान तीन वर्षे तुरुगात पाठवू शकतात. 'इन्स्पेक्टर चौधरींनी आपली नजर घाबरलेल्या कृष्णाच्या नजरेला भिडवली.

'साहेब, त्या वस्तूंच्या धीरावर तर मी जगतो.'

'या दोन लाखांचे स्पष्टीकरण तू करणार आहेस ?'

'साहेब, ते तर माझं पोट आहे. ती माझी आयुष्यभराची कमाई आहे.'

'ही कमाई करायला तुला किती वर्षं लागली ?' चौधरींनी धूर्तपणाने प्रश्न विचारला.

'मी चौदा ते पंधरा वर्षं काम करतो साहेब.'

'इतक्या वर्षांची कमाई तू नेहमीच जवळ घेऊन फिरतोस ?'

'त्याचं असं आहे साहेब...'

'हे बघ कृष्णा, बंगल्यात शिरताना तुझ्या हातात काहीही नव्हतं. बाहेर येताना ब्रिफकेस तुझ्या हातात होती... स्पष्टीकरण करशील ?'

'साहेब, नाही तरी आम्ही पैशासाठीच धडपडत असतो. आमच्यासारखी माणसं पैसा मिळवतात, पण त्याचं स्पष्टीकरण करता येत नाही साहेब.'

'हे बघ कृष्णा, तुझ्याकडून मला तत्त्वज्ञान ऐकायचं नाही. ही चोरी तू केलीस कुठं तेवढं सांग.'

'मी चोरी केली नाही साहेब.'

'तर मग हे पैसे तुला दिले कुणी ?' इन्स्पेक्टर चौधरींचा आवाज एकाएकी चढला. त्यांच्या चेहऱ्याकडेच पहात कृष्णाचे

धाबे दणाणले. इन्स्पेक्टर चौधरी आपल्याला पूर्णपणे अडकवल्या-शिवाय रहाणार नाहीत याची जाणीव त्याला झाली.

आपण चौधरींना विश्वासात घ्यावे... सर्व काही सांगून टाकावें असेही कृष्णाला वाटलें महत्वाची माहिती देणाऱ्या बदमाषाला चौधरी नेहमीच सहानुभूतीने वागवतात याचा अनेक बदमाषांच्या बाबतीत आलेला अनुभव त्याने पाहिला होता.

' साहेब, मी सारं सत्य सांगून टाकतो... पण माझ्यावर अविश्वास दाखवू नका. '

' विश्वास जरुर दाखविन... पण मला पटलं तर. '

' साहेब, भावाचा खून झाल्यानंतर मी चिडलो. माझ्या जागी आपण असता तरी तेच केलं असतं. प्रकृतीने अधू बनलेला गणेश शांतपणानं जगत होता. त्याचा खून परशू आणि इब्राहिम या दोघांनी केलेला आहे हें मला समजलं '

कृष्णाने काही न दडवता सुरवातीपासून जे जे काही घडले ते सांगायला सुरुवात केली. त्यावेळी चौधरींच्या केबिनमध्ये दोघां-शिवाय आणखीन कुणीही नव्हते. आपल्या खुर्चीत बसून चौधरी आरामात ऐकत होते. पण अद्याप त्यांनी कृष्णाला उभेच ठेवलेले होते.

जवळ जवळ दहा मिनिटांनी कृष्णा बोलायचा थांबला. चौधरींच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे तो बोलून गेलेला होता. त्याने आपल्यापासून काहीही दडवले नाही आणि एकही शब्द खोटा उच्चारलेला नाही याची खात्री चौधरांना झालेली होती.

' बैस कृष्णा... आता माझ्या प्रत्येक प्रश्नाचं नीट उत्तर दे. ' थंड आवाजात इन्स्पेक्टर चौधरी बोलले. कृष्णा त्यांच्यासमोर अवघडून बसला. एकामागून एक चौधरींनें दोन न्यायाधिशांच्या संदर्भात प्रश्न विचारायला सुरुवात केली.

' कृष्णा, आदित्य नारायणावर आरोप केलेले आहेत ते

तुला न्यायाधीशानंच सांगितलं . . . त्यावर तुझा विश्वास आहे ?'

' त्याला खोटं बोलायचं काहीच कारण नाही साहेब. '

' आदित्य नारायण दोन न्याबाधिशांपासून संरक्षण करुन घेण्यासाठी तुला नोकरीवर ठेवींत असावा असं तुला नाही वाटत ?'

' माझ्या मनात तोच संशय आला साहेब. दोन न्यायाधीशाची कटकट संपली की मग माझाही काटा काढायला तो मागे पुढे पहाणार नाही असं मला वाटतं.'

' कृष्णा आता मी तुला सोडलं आणि न्यायाधिशानी गाठलं तर तूं काय करशील ?'

' ही दोन हत्यार दिली तर काळजी करण्याचं कारण नाही साहेब. '

' ती तुला मिळणार नाहीत. '

' तर मग साहेब, मला कोठडीत बंद करुन टाका... सात आठ दिवस नाही सोडलं तरी चालेल. '

' कशासाठी ?'

' साहेब न्यायाधिशांच्या बाबतीत मी कोणताही धोका पत्करायला तयार नाही. ती माणसंच भयंकर आहेत. '

' कृष्ण, ही दोन हत्यारं मी तुला देईन... पण याचा उपयोग केवळ न्यायाधीशांविरुद्धच करायचं याची जाणीव तूं ठेवायला हवीस. '

' मी तसा शब्द देतो साहेब. '

' ठीक आहे.. मेजावरच्या तुझ्या सऱ्या वस्तू घे. '

' आणि पैसे साहेब. '

' तेही घे. '

खूप झालेल्या कृष्णाने साऱ्या वस्तू पूर्वीसारख्याच आपल्या

खिशात कोंबल्या. ब्रिफकेस घेऊन तो निघाला. आज उद्या आपली मोटरसायकल मिळेल... तिची काळजी करण्याचे काहीच कारण नव्हते.

फुटपाथवर पाय ठेवताच तो दचकला. आपल्यावर कुणाची तरी नजर असावी असा भास त्याला झाला. न्यायाधीशाचा हुकुम आपण धुडकावून लावलेला आहे. तो न्यायाधीश आपल्याला गाठल्याशिवाय रहाणार नाही या विचाराने त्याचे संपूर्ण शरील शहारल्यासारखे झाले.

नकळत तो पोलिसस्टेशनच्या पायऱ्या चढूला. इन्स्पेक्टर चौधरीच्या केबिनजवळ आला. तेव्हा त्याचे हृदय धडधडत होते. पण चौधरींना काहीही सांगायला कमीपणा मानण्याचे कारण नाही हेच मनाने त्याला बजावले.

'साहेब, मी आत येऊं ?' थरथरत्या आवाजात कृष्णाने विचारले.

'हां... ये.'

'साहेब, हरलो. बाहेर जाण्याचं धैर्य माझ्यात नाही.'

'का ?'

'साहेब, मला न्यायाधीशाची भिती वाटते. मी त्याचा हुकूम मोडलेला आहे. बोलल्याप्रमाणे तो मला सजा केल्याशिवाय राहणार नाही.'

'हवालदार याची वरच्या मजल्यावर रहायची व्यवस्था कर.' घाईघाईत चौधरीने हुकूम सोडला आणि हवालदारने उघडलेल्या दारातून त्याच संथपणाने ते बाहेर पडले.

कृष्णा भलत्याच घमेंडीत निघून गेला असता. तर त्याचें काय झाले असते याचा तर्क चौधरींनी पुर्वीच केलेला होता.



# आठ

संध्याकाळी पाच वाजता आपल्या बंगल्यासमोर पोलिसांनी कडे केलेले आहे हे आदित्य नारायणाच्या लक्षात आले. आपल्या बंगल्याची झडती घेण्याची तयारी करण्यात आलेली असावी याच विचारांचे थैमान त्यांच्या मनात सुरु झाले.

इन्स्पेक्टर चौधरी झडती घेण्यासाठी वॉरंट घेऊन बंगल्यात शिरले तर आपण त्याना कोणत्याही परिस्थितीत विरोध करु शकणार नाही, हे लक्षात येताच आदित्य नारायणाच्या मनातील भीती वाढली.

पण सात वाजले तरीही चौधरी बंगल्यात आले नाहीत किंवा बंगल्याच्या कुंपणाबाहेर सभोवताली पांगलेले पोलिस जागचे हलले नाहीत.

त्यावेळी आदित्य नारायण मनाने पार खचून गेलेला होता. गंगाराम आणि तीन नोकर इतकीच काय ती बंगल्यात त्याची ताकद होती. बायको आणि दोन मुले याना त्याने कालच काल्यांच्या बंगल्यात पाठवलेले होते. दोन न्यायाधिश कोणत्याही परिस्थितीत त्याना हात लावणार नाही याचा विश्वास त्याला होता.

बगल्यातून बाहेर पडल्यानंतर पोलिसांनी कृष्णाला

पकडून नेल्याचे गंगारामने पाहिलेले होते. मुद्देमालासहीत पोलिसांच्या हातात सापडलेला कृष्णा सारे सांगून गेल्याशिवाय राहणार नाही या भितीने तर तो अधिकच बेचैन बनत चाललेला होता.

साडेआठ वाजता इन्स्पेक्टर चौधरी फाटक उघडून आत आले. ते एकटेच आत आलेले पाहून निरनिराळे तर्क करणारा आदित्य नारायण आणखीनच गडबडला. घाईघाईत तो दिवाणखान्यात आला. धडधडत्या अंत:करणाने त्याने चौधरींचे स्वागत केले.

'शेटजी, दोन न्यायाधीशांच्या शिक्षेची मुदत काय?' तापलेल्या आवाजात इन्स्पेक्टर चौधरींनी विचारले आणि पुन्हा एकदा आदित्य हादरला. सावधगिरीसाठी मनावर हवा तो ताबा करु शकला नाही.

'बारा ... मध्यरात्रीची.' नकळत त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले.

'दोन न्यायाधीशाना तोंड देण्याचं सामर्थ्य तुमच्यांत आहे?' दुसरा चौधरींचा प्रश्न अत्यंत महत्वाचा होता. आदित्याचे जगणे आणि मरणे त्या एकाच प्रश्नावर अवलंबून होते. आलेली पोलिसांची मदत नाकारण्याचा आपण मुर्खपणा केला तर आयुष्यात कधीच शहाणपणा करण्याची संधी आपल्याला मिळणार नाही याची खात्री त्याला पटली.

'नाही.'

'आमची मदत हवी?'

'हो ...'

'शेटजी स्वत:वर विश्वास नाही तर काल माझ्याशी खोटं कां बोललात.'

'इन्स्पेक्टर, याचं उत्तर तुम्हालाही माहित असावं.'

'हो ... आहे.'

' इन्स्पेक्टर मध्यरात्रीची बारा ही दोन न्यायाधीशांनी दिलेली वेळ आहे. ती टळली तर न्यायाधीश आपला पराभव मान्य करतील आणि पुन्हा ते कधीच माझ्याकडे वळणार नाहीत. '

इन्स्पेक्टर चौधरी काहीच बोलले नाहीत. त्यानी गंगाराम आणि तीन नोकराना समोर उभे केले. आदित्य नारायणाचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने अत्यंत कडक सूचना चौधरीनी चौघानाही दिल्या.

आणि झपाझप पावले टाकीत ते पोर्चमध्ये आले. क्षणभरच तिथे थांबून त्यानी सर्वत्र नजर फिरवली आणि फाटकाजवळ येऊन ते उभे राहिले. त्यावेळी ते दोन न्यायाधीशांचाच विचार करीत होते. याहून कडक बंदोबस्तात देखील दोन न्यायाधीशानी गुन्हेगाराना सजा केलेली आहे याची कल्पना त्याना होती. 'कोणत्याही परिस्थितीत आदित्य नारायण दोन न्यायाधीशांच्या हातून सुटणार नाही हे त्याना पटलेले होते.

पण त्याला वाचवण्याचा प्रयत्न करणे हे पोलिस अधिकारी या नात्याने त्यांचे कर्तव्य होते.

✠ ✠ ✠

टायगर उर्फ कैलासनाथ भानोत एका इमारतीच्या टेरेसवर उभा राहून आदित्य नारायणच्या बंगल्याकडे पहात होता. अधुनमधून तो एका नळीची दुर्बीण डाव्या डोळ्याला लावीत होता.

बंगल्याच्या सभोवतालची कडक बंदोबस्त पाहून त्याच्यावर कोणताही परिणाम झालेला नव्हता. याहून कडक बंदोबस्त असतांना देखील त्या दोन न्याधीशानी गुन्हेगाराला शिक्षा केलेली होती.

पाच वाजताच पोलिसांचे कडे पाहून झटपट योजना तयार

करणाऱ्या न्यायाधीशाने... टायगरने एक अफलातून योजना आख-लेली होती. सार्थीला टफी नसल्यामुळे योजना आखताना टायगरच्या मनावर थोडेसे दडपण येत होते तेवढेच.

शांतपणे, त्याने इमारतीपासून कांही अंतराबर असलेल्या चार ट्रकांकडे नजर वळविली. तितक्याच समाधानाने तो हसला. ठीक बारा वाजता टफी आदित्य नारायणला फासावर चढवील. आपण ठीक अकरा पंचावन्नला स्वतःची हालचाल करायला हवी हा विचार करुन तो इमारतींच्या मागच्या जिन्यातून खाली उतरला. त्यावेळी टायगरने बेमालूम वेषांतर केलेले होते. या वेषांत भानो-तला पाहून नेहमी भेटणारी मित्रमंडळीसुद्धा त्याला ओळखू शकली नव्हती.

आरामात तो चार ट्रकांजवळ आला. एका ट्रकात तो शिरला. त्या ट्रकात असलेली पिशवी घेऊन तो मागच्या बाजूला आला.

त्या पिशवीत फुटबॉलच्या आकाराचे आणि प्रत्येकी एक किलो वजनाचे सात गोळे होते. . . . प्लॅस्टीकचे. प्रत्येक गोळ्याला अडकवण्यासाठी हूक होता. हूकाच्या विरुद्ध बाजुला गोळ्यातून बारीक तार बाहेर आलेली होती.

त्या हुकात घट्ट तारा घालून सातही गोळे त्याने ट्रकाच्या बॉडीला आतल्या बाजूने निरनिराळ्या ठिकाणी अडकवून टाकले. ड्रायव्हरच्या मागच्या बाजूला असलेल्या छोट्या खिडकीतून काढ-ण्यात आलेल्या तांब्याच्या सात तारा त्याने आणखीन थोड्या खेचून घेतल्या. त्यातील एक तार त्याने एकेका गोळ्याला बाहेर आलेल्या तारेत अडकवल्या.

ड्रायव्हरच्या सीटवर बसून त्याने एकेक तार हलक्या हाताने ओढून पाहिली. सातही तारा नीट जुळवून त्याने त्या पीळ घालून जखडून टाकल्या. दारात अडकवण्यासाठी सीटवर ठेवलेला एक हूक

वाकवलेल्या तारात जखडून टाकला.

चारही ट्रकात त्याने असेच गोळे बांधले आणि तारा अड-कवल्या. सारे काम संपले तेव्हा दहा वाजलेले होते. स्वतःच्याच कामगिरीवर तो बेहद्द खूष झालेला होता. कित्येक महिने तो हा प्रयोग करण्याचा विचार करीत होता, पण तो संधी त्याला आज चालून आलेली होती. या प्रयोगाच्या बाबतीत टफी त्याची नेहमीच टर उडवीत होता... पण त्याची देखील आपण आज जिरवू याच आनं-दात टायगर वावरत होता.

एका ट्रकात बसून तो दूरवरच्या पोलिसांकडे पहात राहिला. नकळत त्याच्या मनात टफीचेच विचार घोळू लागले. मनात नकळत भीती संचारु लागली, पण का कोण जाणे टफीच्या बाबतीत त्याचे मन पूर्णपणे विश्वास व्यक्त करु लागले.

बाराला दहा मिनिटे कमी असताना टायगरने ज्या ट्रकात तो बसला होता तो सुरु केला आणि तसाच न्युट्रलमध्ये ठेऊन त्याने तारांना अडकवलेला हुक दाराला आतल्या बाजूला अडकवला. त्यावेळी डाव्या बाजूच्या दाराची काच वर केलेली होती. त्याच दारातून तो खाली उतरला, पण त्याने दार धाड्कन बंद केले नाही . . . तसेच उघडे राहू दिले. दार बंद केले असते तर लॉक झाल्यामुळे ते पुन्हा उघडता आले नसते.

चारही ट्रक त्याने सुरु केले आणि ड्रायव्हरच्या बाजूच्या दाराला तारांना बांधलेला हुक अडकवला. पुन्हा तो डाव्या बाजूच्या उघड्या दारातून पहिल्या ट्रकात आला तेव्हा अकरा पंचावन्न झाले होते.

त्याने ट्रक फर्स्ट गियरमध्ये टाकला आणि क्लच दाबलेलाच ठेऊन एक्सलरेटर दाबला. त्याने पाय वर काढला. तेव्हा एक्स-लरेटर त्याच्या योजनेप्रमाणेच दाबलेल्या अवस्थेत अडकवून राहिला होता.

हळूहळू क्लचचा पाय वर घेत त्याने ट्रकाला गती दिली. झटक्यात डाव्या बाजूच्या दाराने खाली उतरुन त्याने ते दार बंद केले. बाहेरुन ते उघडता येणार नव्हते आणि स्टिअरींग गच्च बांधलेले असल्यामुळे पुढच्या टायराखाली दगड सापडले तरी तो ट्रक दिशा बदलण्याची शक्यता नव्हती.

तो ट्रक घोंघावत बंगल्याच्या दिशेने निघाला. पाहता पाहता त्याने दुसरा ट्रक सोडला.. त्याच पद्धतीने तिसराही ट्रक निघाला नंतर चौथा आणि घड्याळाचा काटा बारावर असताना पाचव्या ट्रकाने संथपणे बंगल्याच्या दिशेने मुसंडी मारायला सुरुवात केली. निदान एक ट्रक तरी सिमेंटचे फारसे मजबूत नसलेले कुंपण फोडून आत शिरेल याची खात्री टायगरला होती.

चारही ट्रक वेगवेगळ्या मार्गाने कुंपणाला धडक देणार होते. फुटपाथ फारसा उंच नव्हता. कुंपणाच्या खालचा आडवा काठ तर फुटपाथपेक्षाही कमी उंचीचा होता. संपूर्ण परिस्थितीचा विचार करुनच टायगरने तर ही ट्रकाची युक्ती घाईघाईत तयार केलेली होती.



नऊ

दहा वाजता आदित्य नारायण आपल्या खास खोलीत शिरला तेंव्हा तो अतिशय चिडलेला होता. आपण उगाच पोलिसांच्या नादी लागलो असे त्याला वाटत होते. आपल्या या खास खोलीत न्यायाधीशच काय, तर त्याचा श्वास देखील पोचणें शक्य नाही याची कल्पना त्याला होती. आपण उगाच पोलिसाना न्यायाधीशाने दिलेली शिक्षेची वेळ सांगितली हाच विचार त्याच्या मनात आला. पण बंदूकीतून सुटलेली गोळी माघारी आणता येणे शक्य नव्हते.

दर पाच मिनिटानी नकळत त्याची नजर मनगटावरच्या घडयाळावर स्थिर होत होती.

साडे अकरा वाजले आणि त्याने इंटरकॉमचा रिसिव्हर उचलला, बाहेर सारे काही शांत असल्याचे गंगारामकडून समजतांच त्याचे मन बरेच हलके झाले. समाधानाने त्याने रिसिव्हर खाली ठेवला. आणखीन अर्धा तास कसा तरी काढायचा . . . नंतर न्याया-धीशाची आपल्याला कधीच भीती बाळगावी लागणार नाही असा विचार त्यानें केला.

त्याने कोपऱ्याजवळचे दार उघडले. भल्या मोठ्या बाथरुम

मधील दिवा त्याने लावला. बाथरुमचे दार बंद करण्याची गरज त्याला वाटली नाही.

एकाएकी तो दचकला. बाथरुममध्ये बसवलेल्या टाकीचे झाकण अचानक उघडले गेले. दचकून तो वर पहात राहिला. छातीपर्यंत वर आलेला एक बुरखाधारी त्याने पाहिला. त्या बुरखा-धारीच्या उजव्या हातातील रिवॉल्वर आदित्य नारायणाच्या छातीवर रोखलेले होते.

'आदित्य, तोंडातून आवाज काढलास किंवा काही गडबड केलीस तर संपूर्ण रिल्वॉवर तुझ्यावर रिकामे करीन.' बुरखा-धारीच्या तोंडून अत्यंत भेदक असे शब्द बाहेर पडले.

बुरखाधारी न्यायाधीश असल्याची खात्री त्याला झाली. रिवॉल्वर हलवून त्याने इशारा करताच घाबरलेला आदित्य नारायण दाराच्या विरुद्ध दिशेला असलेल्या खिडकीजवळ गेला बुरखाधारीने टाकीचे झाकण वरच्या बाजूला अडकवले आणि शॉवरच्या दांडीला बांधलेला नायलॉनचा दोर टाकीतून बाहेर सोडला.

त्यावेळी पावणेबारा वाजलेले होते.

शॉवरच्या दांडीला बांधलेले दोर फार तर एक फूट लांबीचा होता. खाली लोंबकळत असलेल्या टोकाचा फास तयार करण्यात आला होता आणि थिजल्यासारखा आदित्य नारायण भेदरलेल्या नजरेने त्या फासाकडे पहाण्यापलीकडे काहीच करु शकत नव्हता.

'आदित्य, मी तुला संधी दिली होती.' धपकन खाली उडी घेत न्यायाधीशाने शब्द उच्चारले. पण आदित्य मात्र काही बोलू शकला नाही.

आदित्य नारायणाच्या खिशात रिवॉल्वर होते, बुरखाधारी खाली उडी घेतेवेळी आपण हालचाल करायला हवी होती असे

त्याला वाटू लागले. पण आणि तिही संधी स्वत:च्याच गलथानपणामुळे त्याने गमावलेली होती. आणि पुन्हा तशी संधी येईलच यावर त्याचा विश्वास नव्हता.

'आदित्य, माझ्याकडे पाठ करुन उभा रहा.' न्यायाधीशाने हुकूम सोडला. तो हुकूम धुडकावण्याचे धैर्य त्याला झाले नाहीं. मुकाटयाने त्यानें बुरखाधारीकडे पाठ केली. आपण डोके शांत केले तर या न्यायाधीशावर आपल्याला सहज मात करता येईल ही जाणीव त्याला झाली.

दुसऱ्याच क्षणी तो आश्चर्यचकित झाला. तो बुरखाधारी इतका चपळ असेल हे पूर्वी सांगितले असते तर त्याचा कुणावरही विश्वास बसलाँ नसता.

आपल्या दोन्ही मनगटांना फास आवळले गेले केव्हा आणि ते मागे खेचून जखडले गेले केव्हा . . . कशाकशाचा थांगपत्ता त्याला लागला नाही. प्रतिकार करण्याची त्याची आशा मावळली.

आपण जोरात ओरडावे आणि गंगाराम किंवा बंगल्याबाहेरचे पोलिस सावध होतात का पाहावे असा एक विचार त्याच्या मनात चमकून गेला. पण ओरडून काहीच फायदा होणार नाही हा विचार त्याच्या मनात आला.

'आदित्य तू आरोप वाचलेस ?'

'हो... वाचले.'

'मी दिलेली संधी तुला घ्यावीशी वाटली नाही ?'

'नाही.'

'का नाही ?'

'माझी तीं फार मोठी चूक झाली.'

'त्या चूकीचं प्रायश्चित काय मिळेल हे तुला आता समजलेलंच आहे.'

'यापुढं मी तुझ्या सगळ्या अटी मान्य करीन.'

'ती वेळ निघून गेलेली आहे. आता पुन्हा ती संधी तुला मिळणार नाही. ठिक बारा वाजता तू फासावर चढायलाच हवा. आम्ही जेव्हा शिक्षेची वेळ देतो तेव्हा गुन्हेगार परमेश्वराकडेसुद्धा अपील करु शकत नाही.'

'पण...'

'खुर्चीवर चढून उभा रहा.' तोंडावरचा बुरखा काढून खिशात घालीत न्यायाधीशाने थंड आवाजात हुकूम सोडला आणि दुसऱ्या खिशातील बुरखा काढून न्यायाधीशाने आदित्य नाराणच्या डोक्यावर घातला.

त्यावेळी बारा वाजायला केवळ तीन मिनिटे शिल्लक उरलेली होती.

* * *

दहा वाजल्यापासून इन्स्पेक्टर चौधरी अतिशय सावधपणाने बंगल्याच्या सभोवतालचा पोलिसांचा पहारा न्याहाळीत फेऱ्या घालीत होते आणि पोलिसाना सूचना देत होते. कोणत्याही परिस्थितीत कुणालाही बंगल्याच्या आवारात सोडायचे नाही असा हुकूम चौध-रींनी आपल्या पोलिसाना दिलेला होता.

साडेअकरा वाजता ते बंगल्याच्या उघड्या फाटकासमोर येऊन उभे राहिले. बारकाईने ते सभोवताली पहात होते. एक हवा-लदार आणि जुहू पोलिस स्टेशनचा एक सब इन्स्पेक्टर असे दोघे-जणच त्यांच्याजवळ उभे होते. केवळ सावधगिरी म्हणून जवळपास पोलिसानी गाडीसुद्धा ठेवलेली नव्हती.

पोलिसांचे कडे तोडून कुणी आत जाण्याचा प्रयत्न केला किंवा बाहेर पळून जाण्याचा प्रयत्न केला तरी बेलाशक गोळी झाडण्याचा हुकूम त्यानी प्रत्येक पोलिसाला दिला होता.

बाराला पाच मिनिटे उरली काही घडलेच तर ते याच पाच मिनिटात घडेल याची त्याला कल्पना होती. ही पाच मिनिटे गेली की, आदित्य नारायणाला दोन न्यायाधिशापासून कोणताच धोका होणे शक्य नव्हते.

त्यावेळी रहदारी तशी थांबलेली नव्हती. गाड्या जा ये करीतच होत्या. एकाएकी दचकून त्यानी पलिकडच्या फूटपाथवरून खाली उतरलेला ट्रक पाहिला. आश्चर्यचकित होऊन ते ट्रकाकडे पाहातच राहिले. ट्रकचा एकही दिवा पेटलेला नव्हता. जेव्हा तो ट्रक बंगल्याजवळच्या फूटपाथकडे आला तेव्हा काहीतरी घडणार आहे हे चौधरीनी ओळखले.

आणि त्याचवेळी तसाच दुसरा एक ट्रक समोरच्या बाजूने फूटपाथवर आलेला आणि वेगावत रस्त्यावर उतरणारा त्यांच्या नजरेने टिपला.

ट्रकाला तसा वेग नव्हता. हवालदारने आत ड्रायव्हर नाही हे पाहून ट्रकाच्या दिशेने धाव घेतली. त्याने दाराची मुठ खाली ओढून दार बाहेर खेचले. आणि त्याचवेळी जोरात ओरडून बाजूला उडी घेतली.

लागोपाठ झालेल्या स्फोटाने सारे वातावरण दणाणून गेले. धुराचे लोळ हळुहळू आजूबाजूला सरकले.

तोपर्यंत ट्रकाने सिमेन्टचे कुपण तोडून आणि आडव्या बांधलेल्या तारा तोडून बंगल्याच्या आत प्रवेश केलेला होता आणि दुसऱ्या ट्रकाने फूटपाथ गाठलेला होता

पण अर्ध्या पोलिसांना समोरचे काही एक दिसत नव्हते. पण पांढरा जड गॅस वर उडून जाण्याऐवजी खालीच सारखा पसरत राहिलेला होता. गॅस ज्यांच्या ज्यांच्या डोळ्यात गेला त्याना त्याना काही दिसू शकले नाही. चुरचुरणाऱ्या डोळ्यातुन बाहेर पडणारे पाणी पुसण्यापलीकडे ते काहीच करु शकले नाही.

दुसरा ट्रक पलीकडच्या बाजूचे कुंपण तोडून आंत घुसणार तोच स्वतःला सावरलेल्या इन्स्पेक्टर चौधरीने तो ट्रक थांबवण्याचा प्रयत्न केला. झटक्यात त्यानी दार उघडले आणि आत प्रवेश केला. पण त्याचवेळी लागोपाठ सात स्फोट ट्रकच्या मागच्या बाजूला झालेला त्याने ऐकले. क्लचवर पाय दाबून त्यानी करकचून ब्रेक लावला आणि डिझेल बंद करण्याचा लिव्हर खेचला. ट्रक थांबला पण सर्वत्र गॅस पसरला. समोरचे काहीही दिसत नसतानासुद्धा डाव्या हाताने डोळे चोळीत चौधरी ट्रकातून खाली उतरले आणि कशाला तरी अडखळल्यामुळे खाली आपटले. स्वतःला शिव्या हासडीत ते उठून उभे राहिले.

त्यावेळी सर्वत्र पोलिसात पार गोंधळ माजलेला होता. बंगल्याचे अर्धे आवार पूर्णपणे पांढऱ्या गॅसने भरलेले होते. आणि बंगल्यासमोरचा रस्तादेखील गॅसमुळे दिसेनासा झाला होता. पाच सहा फुटावरचा माणूससुद्धा दिसू शकत नव्हता.

त्यावेळी सारे पोलिस स्फोट झालेल्या जागी नकळत गोळा झालेले होते. स्फोट कसले आणि केले कुणी हे त्याना कळत नव्हते. घोंघावत ट्रकात सापडू नये म्हणून प्रत्येकजण गॅसच्या मर्यादेबाहेर जाण्याचा प्रयत्न करीत होता.

सव्वा बारा वाजून गेले आणि हळूहळू गॅस वितळू लागला. संपूर्ण गॅस वितळला तेव्हा घड्याळात बारा पचवीस झाले होते.

त्यावेळी दोन ट्रक कुंपणाच्या उचवट्यामुळे अडून बंद पडले होते. इन्स्पेक्टर चौधरी घाईघाईत उघड्या दारातून बंगल्यात शिरले. भांबावलेला गंगाराम त्याच्याकडे पहातच उभा राहिलेला होता. मुर्तीमंत भीती त्याच्या चेहऱ्यावर दिसत होते.

' साहेब, मालक रिसिव्हर उचलत नाहीत.' गंगारामने कसे-बसे सांगितले.

' ते आहेत कुठं ?'

' आपल्या खास खोलीस.'

गंगारामला घेऊन ते खास खोलीच्या दारात आले.

' साहेब, ते दार चावीन उघडता येत नाही, ते कसं उघडावं आणि बंद करावं हे फक्त मालकानाच माहित आहे. ' गंगारामने माहिती दिली.

विचार करण्याच्या मन:स्थितीत चौधरी नव्हते. पोलिसाना बोलावून त्याने दार फोडण्याचा हुकूम सोडला. ते भक्कम दार फोडून काढायला जवळ जवळ एक तास लागला. फोडलेल्या दारातून चौधरी गंगारामला घेऊन आत शिरले. ती संपूर्ण खोली रिकामी होती. चौधरी कोपऱ्यात असलेल्या उघड्या दाराकडे आले.

आणि हताशपणे लटकत असलेल्या आदित्य नारायणकडे पाहातच राहिले.

' साहेब, हा न्यायाधीशाचा अजब न्याय. ' थरथरत्या आवाजात गंगाराम बोलला.

' नाही ... अजब अन्याय. ' इन्स्पेक्टर चौधरीचे मन ओरडले. पण त्यांच्या तोंडातून शब्द मात्र बाहेर पडला नाही.

**(समाप्त)**




# गुरुनाथ नाईक

**यांच्या गाजलेल्या**

**निवडक कादंबऱ्या.**

३५ रुपयांच्या कादंबऱ्या २५ रुपयांत घरपोच.

- **विध्वंसक काळयंत्र** – (युध्द कथा) ४/-
- **निकामी बॉंब** – ( ,, ) ४/-
- **वैमानिकाचे पिशाच्च** – (पिशाच्च कथा) ४/-
- **मला फाशी द्या** – (सामाजिक रहस्य कथा) ४/-
- **सात पिढ्यांचा सूड** – ( ,, ,, ) ४/-

आणि जीवनाचे रहस्य सांगणाऱ्या दोन बेफाट सामाजिक कादंबऱ्या एकत्र –

- **मानवी** आणि **स्मशान** १५/-

सफेद कागद ० आकर्षक मुखपृष्ठ ० जाड कव्हर

भरपूर पृष्ठे ० आपली मागणी त्वरित कळवा.

**शिलेदार प्रकाशन**

ए/७ अकबरअली हाऊस, आल्तीन, पणजी (गोवा) ४०३००१

---

कव्हर छपाई – हळदणकर प्रेस, पणजी - गोवा.